सार्वजनिक आरोग्य विभागाची सुधारित व अद्ययावत नागरिकांची सनद प्रसिध्द करण्याबाबत

महाराष्ट्र शासन

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१३/प्र.क्र.१०४/सम-२**

गो.ते.रुग्णालय, संकुल इमारत

८ वा मजला, मंत्रालय, मुंबई.१

तारीख: ६ जुन, २०१५

**वाचा-**

१) सामान्य प्रशासन विभाग शासन परिपत्रक क्रमांक: नासद-२००९/५९५/प्र.क्र.१०२/०९/१८-अ दि.१२.०१.२०१०

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र शासकीय बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ८ (१) (२) मधील तरतुदीनुसार प्रत्येक कार्यालय किंवा विभाग यांनी नागरिकांची सनद प्रसिध्द करण्याची तरतुद करण्यात आली आहे. त्यानुसार सार्वजनिक आरोग्य विभागाची नागरिकांची सनद शासन संगणकीय संकेत स्थळावर प्रसिध्द करण्यात आली परंतु सदरहु सनदेमध्ये कालांतराने झालेल्या बदलांमुळे सुधारित व अद्ययावत नागरिकांची सनद प्रसिध्द करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुसार सार्वजनिक आरोग्य विभागाची अद्ययावत नागरिकांची सनद तयार करुन त्याकरिता सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र.१ च्या परिपत्रकांन्वये गठीत केलेल्या समितीची मान्यता घेण्यात आली आहे.

## शासन निर्णय-

सार्वजनिक आरोग्य विभागाची सुधारित व अद्ययावत नागरिकांची सनद खालील शर्ती अधीन सोबत जोडलेल्या पुस्तीकान्वये प्रसिध्द करण्यात येत आहे. तसेच सदरहु नागरिकांची सनद सार्वजनिक आरोग्य विभागाच्या www.maharashtra.arogya.gov.in व शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

१) गंभीर आजाराबाबत देण्यात येणा-या सेवेबाबत कालावधी नमूद न करता रुग्णाला तात्काळ सेवा उपलब्ध करुन देण्यात यावी.

२) बाहय रुग्ण विभागात उपचार करणा-या रुग्णांसाठी सेवा देणा-या वैद्यकीय अधिका-यांचे नांव नामनिर्देशित करणे (कार्यालयाच्या दर्शनी फलकावर) आवश्यक आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५३०११२८२२१०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Tatoba Maruti Kolekar

Digitally signed by Tatoba Maruti Kolekar
DN: CN = Tatoba Maruti Kolekar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.06.06 14:13:10 +05'30'

(ता.मा.कोळेकर)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव महाराष्ट्र राज्य , मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,महाराष्ट्र राज्य , मंत्रालय,मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री यांचें सचिव, महाराष्ट्र राज्य , मंत्रालय,मुंबई
४. मा. मंत्री, (आरोग्य) यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र राज्य , मंत्रालय,मुंबई
५.. मा. राज्यमंत्री, यांचे स्वीय सहाय्यक महाराष्ट्र राज्य , मंत्रालय,मुंबई
६. मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक,मुंबई ,मंत्रालय ,महाराष्ट्र राज्य ,
७. अप्पर मुख्य सचिव (प्र.सु व र.व.का) सामान्य प्रशासन विभाग , मंत्रालय,मुंबई.
८. प्रधान सचिव, (सा.आ.वि),यांचे स्वीय सहाय्यक महाराष्ट्र राज्य , मंत्रालय,मुंबई
९. उप सचिव (१८अ) ,(सामान्य प्रशासन विभाग),मंत्रालय, मुंबई ३२
१०. आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई
११. आयुक्त, (कुटुंब कल्याण ) व संचालक राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
१२. संचालक, अरोग्य सेवा, संचालनालय, मुंबई.
१३. उप संचालक आरोग्य सेवा, (सर्व परिमंडळे)
१४. जिल्हा शल्य चिकित्सक (सर्व)
१५. जिल्हा आरोग्य अधिकारी (सर्व)
१६. सर्व सहसचिव /उपसचिव / अवर सचिव/ कार्यासन अधिकारी, सार्वजनिक आरोग्य विभाग,मंत्रालय,मुंबई
१७. निवडनस्ती

## प्रस्तावना

भारतीय घटनेच्या मार्गदर्शक तत्वांनुसार कल्याणकारी राज्याची संकल्पना आहे. त्यानुसार नागरिकांचे आरोग्य संवर्धन करणे शासनाचे कर्तव्य आहे. सर्वसाधारणपणे सामान्य नागरिकास आजार असल्यास, त्यास बरे करणे एवढाच मर्यादित दृष्टीकोन सार्जनिक आरोग्याचा नसून, नागरिकांच्या शारिरीक स्थितीबरोबरच त्यांची मानसिक व सामाजिक स्थितीदेखील निरोगी व निकोप राहील अशी परिस्थिती निर्माण करणे आवश्यक आहे. जन-जीवनाच्या अन्न, पाणी व वस्त्र या मुलभूत गरजांबरोबरच वैद्यकीय सेवा ही आजच्या काळात मुलभूत गरजेचा एक भाग बनत चालली आहे.

आरोग्य हे अनुवंशिकता, बाह्यवातावरण, सामाजिक स्थिती व आर्थिक स्थिती यावर अवलंबून असते. आरोग्य संवर्धनासाठी चांगल्या आहार व सवयी, वैयक्तीक स्वच्छता, परिसर स्वच्छता, व्यसनमुक्त राहणीमान इत्यादी गोष्टी आपण होऊन अंगी बाळगणे आवश्यक आहे.

राज्यातील तळागाळातील ग्रामीण जनतेला १) आरोग्य उपकेंद्रे, २ ) प्राथमिक आरोग्य केंद्रे ३) ग्रामीण रुग्णालये या त्रिस्तरीय पध्दतीने आरोग्य सेवा पुरविण्यात येत असून सदर पध्दतीस संदर्भ सेवा समजण्यात येते. ग्रामीण रुग्णालयातील उपचारानंतर आवश्यकतेनुसार रुग्णास जिल्हा रुग्णालयाकडे पाठविले जाते.

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ कलम-८ मधील तरतुदीनूसार सार्वजनिक आरोग्य विभाग नागरीकांची सनद प्रसिध्द करीत आहे. या विभागाशी संबंधीत असलेल्या सेवा तत्परतेने, सौजन्यपुर्वक व सन्मानपूर्वक नागरीकांना उपलब्ध करुन देण्यासाठी हा विभाग बांधिल राहील.

**सार्वजनिक आरोग्य विभागाची रचना -:** मा. मत्री (आरोग्य व कुटुंब कल्याण) हे विभागाचे प्रभारी मंत्री असुन मा. राज्यमंत्री यांच्या अधिपत्याखालील प्रधान सचिव आरोग्य व कुटुंब कल्याण) व सचिव-२ यांच्या नियंत्रणाखालील एकूण २४कार्यासनामध्ये विषयाची विभागणी करण्यात आलेली आहे.

**कार्यपुर्तीचे वेळापत्रक -:** सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत पुरविण्यात येणाऱ्या सेवांच्या कार्यपुर्तीचे वेळापत्रक (परिशिष्ट-२ ) सादर करण्यात आले आहे. महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील प्रकरण ३च्या कलम ११ मध्ये नमूद केलेल्या न्यायप्रविष्ट बाबी, लोक आयुक्त किंवा उपलोक आयुक्त आणि अन्य घटनात्मक संस्था, आयोग, न्यायिक बाबी, केंद्र किंवा अन्य राज्य शासनांच्या संबंधातील प्रकरणे, विधी विधानांशी संबंधित बाबी, मंत्रिमंडळास सादर होणाऱ्या मुख्य धोरणात्मक बाबी इत्यादींना कार्यपुर्तीच्या वेळापत्रकातील स्तंभ क्र. ३ येथील वेळापत्रकातून सुट राहील.

**नियम /शासन निर्णय-:** सार्वजनिक आरोग्य विभागाशी संबंधित नियम अथवा महत्वाचे शासन निर्णय www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध आहेत.

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या नियंत्रणाखाली असलेल्या १)संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई व २)आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई यांचेकडून आरोग्य विषयक कामकाज करण्यात येते.

## विभागाचे नांव सार्वजनिक आरोग्य विभाग :

## नागरीकाची सनद २०१४

अनुक्रमाणिका

## सार्वजनिक आरोग्य विभागाची विषयसूची

### कार्यासन आस्थापना

१) खुद्द विभागातील अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या सर्व सेवाविषयक बाबी.

२) खुद्द विभागासाठी नवीन पदे निर्माण करणे/ पदे पुढे चालू ठेवणे.

३) खुद्द विभागाशी संबंधित आकस्मिक खर्चाची विलंबित देयके.

४) खुद्द विभागाशी संबंधित लेखा कार्यालयाकडून आलेले निरीक्षण अहवाल.

५) खुद्द विभागातील अधिका-यांच्या व कार्यालयाच्या वापरात असलेली वाहने व त्यांचे परिरक्षण व अन्य बाबी.

६) खुद्द विभागातील अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या प्रशिक्षण विषयक बाबी.

७) खुद्द विभागातील अधिकारी/कर्मचारी यांची वेतननिश्चिती, विभागातील कर्मचाऱ्यांसंदर्भात आश्वासीत प्रगती योजना.

८) खुद्द विभागातील अधिकारी / कर्मचाऱ्यांना अनुज्ञेय असलेले सर्व प्रकारचे अग्रीम, व ना- परतावा अग्रीम.

९) विभागातील प्रलंबित प्रकरणांची माहिती अद्ययावत ठेवणे व सामान्य प्रशासन विभागास पाठविणे.

१०) प्रलंबित प्रकरणे,आश्वासने व लेखा आक्षेपाशी संबंधित मासिक आढावा बैठक.

### ई-गव्हर्नन्स

१) सार्वजनिक आरोग्य विभाग व एन.आर.एच.एम.संबंधी ई-गर्व्हनन्स संबंधित सर्व बाबी

२) विभागाचा (खुद्द) संगणक कक्ष व विभागातील/कामाचे संगणकीकरण व त्याचे समन्वय, विभागाची वेबसाईट अद्ययावत ठेवणे, संचालक, माहिती व तंत्रज्ञान यांचेशी समन्वय ठेवणे व वेळोवेळी प्रशिक्षण आयोजित करणे.

३) मॅनेजमेंट ऑफ इन्फर्मेशन सिस्टिम (MIS)

### कार्यासन रोखशाखा

१) सर्व प्रकारची देयके तयार करणे.

२) दैनंदिन व्यवहाराचे लेखे व्यवस्थित ठेवणे (रोकड वही लिहिणे वगैरे )

३) अर्थसंकल्प/सुधारित अर्थसंकल्प तयार करण्यासाठी विनियोजन लेखे तयार करण्यासाठी माहिती पुरविणे व खर्च ताळमेळ (Reconciliation).

४) शासकीय पैसा जमा करणे व त्याचा भरणा करणे.

५) अधिकारी व कर्मचारी यांच्या आयकराची परिगणना करणे.

६) आयकर, घरभाडे भविष्य निर्वाह निधीची वर्गणी आणि भविष्य निर्वाह निधी अग्रिम वसूली, उत्सव अग्रिम, शासकीय कर्जाचे हप्ते वगैरे सर्व प्रकारच्या मुलत: देयकातच करावयाच्या वसुल्यासंबंधातील परिशिष्टे / दाखले तयार करणे.

७) कर्मचारीवृदांच्या वार्षिक वेतनवाढीच्या नोंदी सेवापुस्तकात घेणे.

८) प्रवासभत्ता, प्रवासभत्ता अग्रिम, उत्सव अग्रिम आणि इतर अग्रिमांबाबत देयके तयार करणे.

९) खुद्द विभागाशी संबंधीत लेखा परीक्षा ज्ञापने व लेखा परीक्षा आक्षेप यांची उत्तरे देणे.

१०) अंतिम वेतन प्रमाणपत्र तयार करणे.

११) विभागातील अधिकारी व कर्मचारी हयांच्या वेतन भत्ते व मानधन यावर होणारा खर्च तसेच विभागामध्ये होणारा आकस्मिक खर्च हयांचा मेळ घालणे.

१२) वेतन पट (Acquaintance Roll) तयार करणे.

१३) कर्मचारी वर्गाने केलेल्या खाजगी दूरध्वनीबाबत त्यांच्याकडून वसूली करणे व अशा वसूल केलेल्या रकमांचा भरणा करणे.

१४) कर्मचा-यांची सेवापुस्तके अद्यावत ठेवणे.

१५) सर्व प्रकारची पुरवणी देयके तयार करणे.

१६) हमीपत्रे व त्यांची वार्षिक पडताळणी.

१७) चतुर्थश्रेणी कर्मचा-यांचे भविष्य निर्वाह निधी लेखे व्यवस्थित ठेवणे.

१८) तृतीयश्रेणी कर्मचा-यांच्या भविष्य निर्वाह निधीच्या मुख्य सूची अद्यावत ठेवणे.

१९) व्यवसाय,व्यापार,आजीविका आणि रोजगार अधिनियम १९७५ खालील करांची वसूली.

## कार्यासन अर्थसंकल्प

१) अर्थसंकल्पिय अंदाज

२) विभागाचे अर्थसंकल्प तयार करणे व अर्थसंकल्पिय तरतुदीचे वितरण

३) सुधारित अंदाज

४) अर्थसंकल्पिय व सुधारित तरतुदीचे वितरण (मुख्य लेखाशिर्ष ७६१० व २२३५ सह)

५) मुख्य लेखाशिर्ष निहाय कॅशफ्लो विवरणपत्र

६) लेखा अनुदानाचे बाब निहाय कॅशफ्लो विवरणपत्र

७) अर्थसंकल्पिय तरतुदीचे वैधानिक विकास मंडळ निहाय वाटप

८) वित्त मंत्र्यांचे अर्थसंकल्पावरील अभिभाषण (सचिवांमार्फत अ.मु.स.कडे सादर करणे)

९) बीम्स प्रणालीवर कॅशफ्लो भरणे

१०) वार्षिक योजना नियत व्यय वाटप

११) वैधानिक विकास मंडळ निहाय तरतुदीचे वाटप

१२) राज्य व केंद्र पुरस्कृत योजनांचे विवरणपत्र (विवरणपत्र -१ व २)

१३) वार्षिक योजना पुस्तिका प्रकरण (मराठी व इंग्रजी ) (Chapter / Outline)

१४) आदिवासी वार्षिक उपयोजना

१५) अनुसूचित जाती वार्षिक उपयोजना

१६) वित्तीय तरतुदीची अ,ब, क विवरणपत्रे

१७) ग्रामविकास विभाग जिल्हानिहाय तरतुदीचे विवरणपत्र

१८) योजनेतर व योजनांतर्गत खर्चाचा आढावा

१९) व्यवसायिक क्षेत्रातील सामाजिक बांधीलकीची क्षेत्रे (Corporate Social Responsibility)- C.S.R.Cell

## लेखा कार्यासन

१) महसूली जमा, विनियोजन लेखे व नागरी अहवालावरील मुद्यांवरील स्पष्टीकरणात्मक ज्ञापने तयार करुन महालेखापाल यांच्याकडून तपासून (VETT) घेणे

२) लेखापरिक्षण व लेखापरिक्षा अहवालातील प्रलंबित परिच्छेद

३) लोकलेखा समिती विषयक सर्व बाबी

४) महालेखापाल यांच्याकडून प्राप्त होणाऱ्या Warning Slips वर कार्यवाही करणे

५) सुधारित अंदाजाच्या आधारे महालेखापाल यांच्याकडील अंतिम अनुदानाचा ताळमेळ करणे

६) चुकीच्या नोंदीचा प्रस्ताव महालेखापालांना पाठविणे

७) प्रलंबित संक्षिप्त देयकांचा निपटारा

८) अंदाज समितीची साक्ष व समितीच्या अहवालावर कार्यवाही करणे

९) केंद्र पुरस्कृत योजनेंतगर्त प्राप्त होणाऱ्या सर्व प्रकारच्या अनुदानाच्या उपयोगिता प्रमाणपत्राचे समन्वये व अनुदानाचे संनियंत्रण करणे

१०) कार्यक्रम अंदाजपत्रक छपाई

११) आदिवासी कार्यक्रम अंदाजपत्रक

१२) महसूल विषयक सर्व बाबी

१३) खर्चाचा ताळमेळ (सर्व मागण्यांच्या खर्चाच्या)

१४) वित्त आयोग

१५) वीस कलमी कार्यक्रम

१६) कार्यालय परिक्षण व क्षेत्रिय स्तरावरील अंतर्गत लेखा परिच्छेद यांचा आढावा

**कार्यासन - नोंदणी शाखा**

१) विभागात येणारी सर्व पत्रे, संदर्भ स्विकारुन त्यांची नोंदणी करणे व वाटप.

२) विभागातून बाहेर जाणा-या पत्रांची नोंद घेऊन ती निर्गमित करणे.

३) लेखन सामग्री/लेखे ठेवणे/पुरवठा करणे व साठा रजिस्टरमध्ये नोंदी घेऊन साठा रजिस्टर अद्यावत करणे.

४) विभागातील सर्व फर्नीचरची तसेच यंत्रसामुग्रीची नोंद Dead Stock Register मध्ये घेणे.

५) शासकीय मुद्रांकाचा हिशोब ठेवणे व संबंधित रजिस्टरमध्ये त्याबाबत वेळोवेळी नोंदी घेणे.

६) फ्रॅन्कींग मशीनमधील रकमेचा हिशोब ठेवणे व मशीनचे परिरक्षण इ.

७) वर्ग-४ कर्मचा-यांवर देखरेख नियंत्रण/ उपस्थिती.

८) निष्क्रीय वस्तूंची विल्हेवाट.

९) विभागातील यंत्रसामुग्रीची दुरुस्ती उदा. झेरॉक्स/फॅक्स/फ्रॅन्कींग/रोनियो इ.

१०) अधिका-यांना अनुज्ञेय वस्तूंचा पुरवठा करणे.

११) दूरध्वनी, स्टेशनरी, फर्निचर, झेरॉक्स, संगणक, रोनिओ मशीन व फॅक्स यंत्रे पुरवठा व त्याचे परिरक्षण.

१२) खुद्द कार्यालयाच्या बैठक व्यवस्थेशी संबंधित बाबी.

**कार्यासन सेवा - १**

अ) सामान्य राज्यसेवा गट-ब, वैद्यकीय अधिकारी गट-ब व दंतशल्य चिकित्सक संवर्गातील अधिकाऱ्यांच्या सेवाविषयक खालील बाबी :-

१) नियुक्ती / कायम करणे / पदनियुक्ती चालू ठेवणे इ.

२) परिवीक्षा कालावधी.

३) बदली आणि पदस्थापना

४) ज्येष्ठता व पदोन्नती.

५) सेवानिवृत्ती / पुन्हा सेवेत घेणे / सेवेत मुदतवाढ / पुनर्नियुक्ती.

६) विशेष वेतन / अधिक वेतन /व्यवसायरोध भत्ता.

७) परसेवेत प्रतिनियुक्तीवर पाठविणे.

८) सेवेतील खंड माफ करणे.

९) रजा.

१०) सेवानिवृत्ती वेतन.

११) विलंबित दावे (वेतन,भत्ता तसेच प्रवास भत्ता वगैरे).

१२) घरभाडे भत्ता (धोरण विषयक बाबी).

१३) गोपनीय अहवालातील प्रतिकूल शेरे काढून टाकणेविषयक बाबी.

१४) आकृतीबंधानुसार गट-ब मधील अधिकाऱ्यांची कार्यक्रम प्रमुख निहाय, जिल्हा निहाय मंजूर पदे, भरलेली पदे व रिक्त पदे याबाबतची संपूर्ण कार्यवाही.

१५) गट-ब अधिकाऱ्यांच्या वेतनश्रेणीत आवश्यक ती वाढ / सुधारणा करणे.

ब) राज्य कामगार विमा योजनेतील सर्व कर्मचा-यांच्या सेवा विषयक खालील बाबी :-

१) गट अ व ब संवर्गातील अधिका-यांची/ कर्मचा-यांची नामनिर्देशनाने/ पदोन्नतीने नियुक्ती.

२) सर्व संवर्गाचे सेवा प्रवेश नियम तयार करणे.

३) गट अ व ब संवर्गातील अधिकाऱ्यांची विभागीय चौकशी / शिस्तभंग विषयक कार्यवाही / ए.सी.बी. व न्यायालयीन प्रकरणे.

४) गट अ व ब संवर्गातील अधिका-यांची ज्येष्ठता सूची.

५) परसेवेत प्रतिनियुक्तीवर पाठविणे, शिष्यवृत्या (कॉमन वेल्थ कोलंबो प्लान)

६) गट अ ते ड संवर्गातील अधिकारी व कर्मचाऱ्यांच्या वैद्यकीय खर्चाची प्रतिपूर्ती

७) विलंबित दावे (वेतन व भत्ते, प्रवासभत्ता इ.)

८) गट अ व ब संवर्गातील अधिका-यांच्या गोपनीय अहवालाचे संस्करण

९) गट अ व ब संवर्गातील अधिसेविका/सहाय्यक अधिसेविका यांच्या सर्व सेवाविषयक बाबी.

१०) परिचर्या सेवा विषयक प्रकरणे.

**कार्यासन सेवा-२**

१) संचालक, अतिरिक्त संचालक,सहसंचालक (आरोग्य), उपसंचालक आरोग्य सेवा सर्व जिल्हाशल्य चिकित्सक सर्व, जिल्हा आरोग्य अधिकारी व विशेष संवर्गाच्या प्रशासकीय बाबी अधिकारी यांच्या प्रशासकीय बाबी.

२) सामान्य राज्यसेवा गट-अ विषयक सर्व बाबी.

३) संचालक,उपसंचालक,सहायक संचालक,प्रयोगशाळा यांच्या आस्थापना विषयक सर्व बाबी

**अ)** आरोग्य सेवेतील गट-अ संवर्गातील सर्व अधिका-यांच्या सेवा विषयक खालील सर्व बाबी (वैद्यकीय अधिकारी वगळून) :-

१) नियुक्ती व बदली

२) परिविक्षाधीन कालावधी.

३) स्थायी प्रमाणपत्र

४) ज्येष्ठता व पदोन्नती

५) गट-अ मध्ये पदोन्नती तसेच यासाठी निवडसूची तयार करणे.
६) सेवानिवृत्ती / सेवेत मुदतवाढ / पुनर्नियुक्ती / पुन्हा सेवेत घेणे/स्वेच्छा सेवा निवृत्ती
७) विशेष वेतन/अधिक वेतन/व्यवसाय रोध भत्ता.
८) वेतन निश्चिती आणि भत्ते.
९) परसेवेत प्रतिनियुक्तीवर पाठविणे.
१०) सेवेतील खंड माफ करणे.
११) रजा.
१२) सेवानिवृत्ती वेतन.
१३) गट-अ मधील अधिकाऱ्यांच्या गोपनीय अभिलेखाचे संस्करण.
१४) विलंबित दावे (वेतन, भत्ता तसेच प्रवास भत्ता वगैरे)

**ब)** गट-अ च्या अधिकाऱ्यांना यशदा, फेलोशिप, सेमिनार, प्रशिक्षण कार्यक्रमासाठी प्रतिनियुक्तीवर पाठविणे.

क) गट-अ संवर्गातील अधिकाऱ्यांचे सेवा प्रवेश नियम.

ड) गट-अ च्या अधिकारी संघटनेकडून प्राप्त होणारी निवेदने.

**कार्यासन सेवा - ३**

अ) आरोग्य सेवा संचालनालयातील महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट-अ संवर्गातील वैद्यकीय अधिका-यांच्या सेवा विषयक खालील सर्व बाबी :-

१) नियुक्ती/नेमणूक कायम करणे /अस्थायी नियुक्ती संबंधी बाबी
२) परिविक्षा कालावधी / बदली आणि पदस्थापना / वेतन निश्चिती आणि भत्ते / रजा.
३) सेवानिवृत्ती / सेवेत मुदतवाढ / पुनर्नियुक्ती / पुन्हा सेवेत घेणे.
४) ज्येष्ठता / वै.अ.गट-अ मध्ये पदोन्नती देणे तसेच यासाठी निवडसूची तयार करणे.
५) विशेष वेतन / अधिक वेतन / व्यवसाय रोध भत्ता.
६) परसेवेत प्रतिनियुक्तीवर पाठविणे.
७) सेवेतील खंड माफ करणे.
८) सेवानिवृत्त वेतन.
९) गट-अ मधील अधिकाऱ्यांच्या गोपनीय अभिलेखाचे संस्करण.
१०) विलंबित दावे (वेतन,भत्ता तसेच प्रवास भत्ता वगैरे )

ब) पदव्युत्तर अभ्यासक्रमासाठी वैद्यकीय अधिकाऱ्यांची निवड.

क) पदव्युत्तर अभ्यासक्रमासाठी अवघड प्राथमिक आरोग्य केंद्र घोषित करणे.

ड) म.वै.आ.से.गट-अ मधील अधिकाऱ्यांच्या गोपनीय अहवालातील प्रतिकूल शेरे काढून टाकणे.

इ) म.वै.आ.से.गट-अ संवर्गातील वैद्यकीय अधिकारी पदाचे सेवाप्रवेश नियम.

फ) वैद्यकीय अधिकारी गट-अ च्या संघटनेकडून प्राप्त होणारी निवेदने.

## कार्यासन सेवा-४

आरोग्य सेवा संचालनालयाच्या अधिपत्याखालील गट अ व ब संवर्गातील अधिका-यांबाबतच्या तसेच राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानातील अधिकारी/कर्मचारी संबंधी (कंत्राटी अधिकारी/कर्मचारी वगळून) तक्रारी/विभागीय चौकशी फौजदारी कार्यवाही/ए.सी.बी.प्रकरणे तसेच विभागीय चौकशी व फौजदारी कार्यवाहीच्या संदर्भातील न्यायालयीन बाबी असलेल्या अधिका-यांची प्रकरणे. त्याचप्रमाणे अधिका-यांविरुध्द आलेल्या तक्रारीच्या अनुषंगाने प्रकरणे (सदर प्रकरण बंद होईपर्यंत)

| | |
|---|---|
| कोल्हापूर मंडळ | कोल्हापूर,सांगली,सातारा,सिंधुदुर्ग |
| पुणे मंडळ | पुणे,सोलापूर |
| नाशिक मंडळ | नाशिक,धुळे,नंदूरबार,जळगांव,अहमदनगर |

## कार्यासन सेवा-४ अ

आरोग्य सेवा संचालनालयाच्या अधिपत्याखालील गट अ व ब संवर्गातील अधिका-यांबाबतच्या तसेच राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानातील अधिकारी/कर्मचारी संबंधी (कंत्राटी अधिकारी/कर्मचारी वगळून) तक्रारी/विभागीय चौकशी/ फौजदारी कार्यवाही/ए.सी.बी.प्रकरणे तसेच विभागीय चौकशी व फौजदारी कार्यवाहीच्या संदर्भातील न्यायालयीन बाबी असलेल्या अधिका-यांची प्रकरणे. त्याचप्रमाणे अधिका-यांविरुध्द आलेल्या तक्रारीच्या अनुषंगाने प्रकरणे (सदर प्रकरण बंद होईपर्यंत)

| | |
|---|---|
| औरंगाबाद मंडळ | औरंगाबाद,जालना,हिंगोली,परभणी |
| लातूर मंडळ | लातूर,उस्मानाबाद,बीड,नांदेड |
| मुंबई मंडळ | ठाणे,रत्नागिरी,रायगड,मुंबई |

## कार्यासन सेवा-४ ब

आरोग्य सेवा संचालनालयाच्या अधिपत्याखालील गट अ व ब संवर्गातील अधिका-यांबाबतच्या तसेच राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानातील अधिकारी/कर्मचारी संबंधी (कंत्राटी अधिकारी/कर्मचारी वगळून) तक्रारी/विभागीय चौकशी फौजदारी कार्यवाही/ए.सी.बी.प्रकरणे तसेच विभागीय चौकशी व फौजदारी कार्यवाहीच्या संदर्भातील न्यायालयीन बाबी असलेल्या अधिका-यांची प्रकरणे. त्याचप्रमाणे अधिका-यांविरुध्द आलेल्या तक्रारीच्या अनुषंगाने प्रकरणे (सदर प्रकरण बंद होईपर्यंत)

| | |
|---|---|
| नागपूर मंडळ | नागपूर,भंडारा,चंद्रपूर,गोंदिया,वर्धा,गडचिरोली, |
| अकोला मंडळ | अकोला,वाशिम,अमरावती,बुलढाणा ,यवतमाळ |

## कार्यासन सेवा -५

१) आरोग्य सेवा संचालनालयाच्या गट-ब (अराजपत्रित), गट-क व गट-ड (वर्ग-३ व ४) संवर्गातील कर्मचाऱ्यांच्या सेवाविषयक बाबी.

२) आकृतीबंधानुसार गट-ब (अराजपत्रित) तसेच गट-क व गट-ड मधील कर्मचाऱ्यांची कार्यक्रम प्रमुखनिहाय, जिल्हानिहाय मंजूर पदे, भरलेली पदे व रिक्त पदे याबाबतची संपूर्ण कार्यवाही.

३) गट-ब (अराजपत्रित) तसेच गट-क व गट-ड मधील कर्मचाऱ्यांच्या वेतनश्रेणीत आवश्यक ती वाढ/सुधारणा करण्याबाबत तसेच इतर मागण्यांबाबतची सर्व प्रकरणे.

४) आरोग्य विभागाच्या सर्व कार्यक्रमाशी संबंधित क्षेत्रिय कार्यालयातील गट-ब (अराजपत्रित तसेच गट-क व गट-ड) कार्यालयातील कर्मचा-यांची भरती प्रक्रिया,सेवाप्रवेश नियम,वैद्यकीय खर्च प्रतीपूर्ती व इतर सर्व सेवाविषयक बाबी.

**कार्यासन - समन्वय-१**

१) विधानमंडळ कामकाजाचे समन्वय.

२) पंचायत राज समितीच्या सार्वजनिक आरोग्य विभागाविषयीच्या शिफारशीवर कारवाई.

३) विधीमंडळाच्या अन्य समित्यांचे कामकाज (अंदाज समिती वगळून).

४) सार्वजनिक आरोग्य विभागामधील प्रलंबित आश्वासने व त्यांचा निपटारा.

५) लोकलेखा समिती विषयक सर्व बाबी.

६)केंद्र शासन/इतर राज्यातील अतिथि दौरेबाबत प्रकरणे.

**कार्यासन- समन्वय-२**

१) मंत्रीमंडळाने घेतलेल्या निर्णयाबाबत केलेल्या कार्यवाहीची एकत्रित माहिती पाठविणे.

२) इतर कार्यासनाशी संबंधीत नसलेले (सेवा विषयक बाबी वगळून)

३) विभागातील समन्वय व संकिर्ण बाबी.

४) मागासवर्गीय व अपंगाचे आरक्षण या संदर्भातील माहिती अद्यावत ठेवणे.

५) राज्यपालांचे अभिभाषण.

६) वि.का.क.शी संबंधीत प्रकरणांचा समन्वय.

७) माहितीचा अधिकार कायदा, २००५ बाबतच्या विभागातील दोनपेक्षा जास्त कार्यासनांशी संबंधित प्रकरणांचा समन्वय.

८) विभागातील कोणत्याही कार्यासनांशी संबंध नसलेल्या विषयाबाबतचा माहिती अधिकार कायद्यातंर्गत प्राप्त अर्ज.

९) किमान गरजा कार्यक्रम व त्यांची अंमलबजावणी.

१०) Key Result Area (KRA) संबधीची कार्यवाही.

**कार्यासन आरोग्य - ३**

**नागपूर, अकोला व नाशिक मंडळ**

१) मंडळातील रुग्णसेवा,सर्व प्रकारच्या आरोग्य संस्थांची निर्मिती,पदनिर्मिती, व पदांच्या मुदवाढीचे तथा स्थायीकरण इत्यादीचे प्रस्ताव.

२) आरोग्य संस्थांच्या अभ्यागत समित्या नियुक्त करणे व सदर समित्यांशी संबंधित बाबी.

३) मानसेवी व सहाय्यक मानसेवी वैद्यकीय अधिका-यांची पदे निर्माण करणे व नेमणूका.

४ आरोग्य संस्थांच्या स्थावर मालमत्ता/जमिनी,त्यांचे अभिलेख आणि त्या अनुषंगाने येणारी प्रकरणे.

५) शवविच्छेदन सुविधा निर्माण करणे.

६) ट्रामा केअर युनिट.

७) अदिवासी क्षेत्र, नक्षलग्रस्त क्षेत्र व इतर मागास भागासाठी शासनाने केलेला विशेष कृती कार्यक्रम

८) सार्वजनिक आरोग्य संस्था, नागपूर,आरोग्य व कुटुंब कल्याण प्रशिक्षण केंद्र व अन्य प्रशिक्षण केंद्र तसेच प्रशिक्षण कार्यक्रमाचे नियोजन

९) नगरपालिकेच्या/महापालिकेच्या व जिल्हा परिषदांच्या रा.का.वि.यो. व अन्य आरोग्य संस्था शासनाच्या ताब्यात घेणे.

१०) संपूर्ण राज्यात आरोग्य संस्था स्थापनेचा बृहत आराखडा (Master Plan) तयार करणे.

११) राज्यातील आरोग्य संस्थांच्या मालकीच्या जमिनींचे अभिलेख तयार करणे (सचिव-२) यांच्यामार्फत अ.मु.स.यांना सादर करणे)

१२) आपत्कालिन रुग्ण प्रतिसाद सेवा (EMRS)

१३) आईसी ब्यूरो व प्रसिध्दी विषयक कार्यक्रम

१४) MMU मोबाईल मेडिकल-युनिट

१५) क्षय/उरो रुग्णालय

१६) आनंदीबाई जोशी पुरस्कार योजना

१७) आरोग्य संस्थांची बांधकाम विषयक प्रकरणे (राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान कार्यक्रमाखालील बांधकामासह)

१८) अनुशेष व निर्देषांक समितीने दिलेल्या अहवालावरील कार्यवाही.

**कार्यासन आरोग्य-३ (अ) ठाणे,पुणे मंडळ**

१) मंडळातील रुग्णसेवा सर्व प्रकारच्या आरोग्य संस्थांची निर्मिती,पदनिर्मिती, व पदांच्या मुदतवाढीचे तथा स्थायीकरण इत्यादीचे प्रस्ताव.

२) वरील आरोग्य संस्थांच्या अभ्यागत समित्या नियुक्त करणे व सदर समित्यांशी संबंधित बाबी.

३) मानसेवी व सहाय्यक मानसेवी वैद्यकीय अधिका-यांची पदे निर्माण करणे व नेमणूका.

४) मानसिक आरोग्य अधिनियम व त्याबाबतच्या नियमाशी संबंधित सर्वसाधारण बाबी. (संपूर्ण राज्यासाठी)

५) आरोग्य संस्थांच्या स्थावर मालमत्ता/जमिन व त्यांचे अभिलेख आणि त्या अनुषंगाने येणारी प्रकरणे.

६) शवविच्छेदन सुविधा निर्माण करणे.

७) ट्रामा केअर युनिट

८) नगरपालिकेच्या/महापालिकेच्या व जिल्हा परिषदांच्या रा.का.वि.यो.व अन्य आरोग्य संस्था शासनाच्या ताब्यात घेणे

९) राज्य आरोग्य प्रयोगशाळेशी संबंधित सर्व कामकाज

१०) असंसर्गजन्य रोग (राष्ट्रीय कार्यक्रम) (NPCDCS राष्ट्रीय मधुमेह,हृदय विकार इ.)

११) MMU मोबाईल मेडिकल-युनिट

१२) राष्ट्रीय कर्करोग,मधुमेह, हृदय विकार,पक्षघात नियंत्रण कार्यक्रम

१३) क्षय/उरो रुग्णालये

१४) राष्ट्रीय मानिसिक आरोग्य कार्यक्रम

१५) राष्ट्रीय वृध्दत्व आरोग्य निगा कार्यक्रम

१६) आरोग्य संस्थाची बांधकाम विषयक प्रकरणे,राष्ट्रीय आरोग्य अभियान कार्यक्रमाखालील बांधकामासह

१७) इतरत्र न दर्शविलेले सर्व ज्ञात/अज्ञात असंसर्गजन्य रोग

## कार्यासन आरोग्य-४

### कोल्हापूर, औरंगाबाद व लातूर मंडळ

१) मंडळातील रुग्णसेवा,सर्व प्रकारच्या आरोग्य संस्थांची निर्मिती,पदनिर्माती, व पदांच्या पदवाढीचे तथा स्थायीकरण इत्यादीचे प्रस्ताव.

२) वरील आरोग्य संस्थांच्या अभ्यागत समित्या नियुक्त करणे व सदर समित्यांशी संबंधित बाबी.

३) मानसेवी व सहाय्यक मानसेवी वैद्यकीय अधिका-यांची पदे निर्माण करणे व नेमणूका.

४) आरोग्य संस्थांच्या स्थावर मालमत्ता/जमिन व त्यांचे अभिलेख आणि त्या अनुषंगाने येणारी प्रकरणे.

५) शवविच्छेदन सुविधा निर्माण करणे.

६) ट्रामा केअर युनिट

७) नर्सिग स्कूल्स (अनुदानाच्या प्रकरणाखेरीज) मान्यता व प्रशासकीय बाबी.

८) नगरपालिकेच्या /महापालिकेच्या व जिल्हा परिषदांच्या रा.का.वि.यो. व अन्य आरोग्य संस्था शासनाच्या ताब्यात घेणे.

९) उपसंचालक, राज्य आरोग्य सेवा, परिवहन यांच्या कार्यालयाचे कामकाज व प्रशासकीय बाबी.

१०) MMU मोबाईल मेडिकल-युनिट

११) क्षय/उरो रुग्णालये

१२) राष्ट्रीय कर्णबधिरता प्रतिबंध व नियंत्रण कार्यक्रम

१३) राष्ट्रीय फ्ल्युरोसिस कार्यक्रम

## कार्यासन आरोग्य-५

खालील राष्ट्रीय आरोग्य कार्यक्रम व त्याची अंमलबजावणी व प्रशासकीय बाबी

१) राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रम

२) राष्ट्रीय क्षयरोग नियंत्रण कार्यक्रम

३) राष्ट्रीय हिवताप निर्मूलन कार्यक्रम

४) राष्ट्रीय हत्तीरोग नियंत्रण कार्यक्रम

५) राष्ट्रीय एडस् नियंत्रण कार्यक्रम

६) राष्ट्रीय गलगंड नियंत्रण कार्यक्रम

७) गुप्तरोग नियंत्रण कार्यक्रम

८) मौखिक आरोग्य कार्यक्रम

९) नेत्रपेढया

१०) नारु निर्मूलन कार्यक्रम

११) व्यसनमुक्ती कार्यक्रम (तंबाखुजन्य पदार्थ)

१२) राष्ट्रीय कुष्ठरोग निर्मूलन कार्यक्रम

१३) कुष्ठरोग संस्थांना अनुदान

१४) सर्व साथरोग अतिवृष्टीमुळे दुषित झालेल्या पाण्याने पसरलेले साथींचे आजार

१५) इंडियन एपिडेमिक ॲक्ट व अंमलबजावणी.

१६) नागरी संरक्षण व आपातकालीन व्यवस्थापन (डिझास्टर मॅनेजमेंट)

१७) रक्तपेढया व रक्तसंक्रमण सेवा
१८) ईतरत्र न दर्शविलेले संसर्गजन्य रोग/साथरोग
१९) जीवन अमृत सेवा
२०) सर्व मेट्रो ब्लड बँक

**कार्यासन आरोग्य-६**

१) वैद्यकीय मंडळाची रचना व त्या अनुषंगाने इतर बाबी.
२) महाराष्ट्र आरोग्य सेवा विकास प्रकल्पसंबंधीची प्रकरणे
३) जीवनदायी आरोग्य योजना (सचिव २ सा.आ.वि. यांच्यामार्फत सादर करणे)
४) राजीव गांधी जीवनदायी योजना.
५) मानवी अवयव प्रत्यारोपण विषयक बाबी.
६) आरोग्य विमा योजना.
७) धर्मदाय रुग्णालयासंबंधी प्रकरणे.

**कार्यासन आरोग्य-७**

१) संपूर्ण राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान कार्यक्रमाची अंमलबजावणी व अनुषंगिक सर्व बाबी.
२) अभियानासंदर्भात केंद्र शासनाशी समन्वय.
३) अभियान संचालक व त्यांच्या कार्यालयाच्या प्रशासकीय व वित्तीय बाबी.
४) कार्यक्रमाचा आढावा व मुल्यमापन
५) अभियानसंदर्भात समन्वय (आर.सी.एच.सोबत)
६) सिकलसेल ॲनिमिया प्रतिबंध, हिमोफिलीया, थॅलेसिमियाच्या सर्व बाबी व रोग नियंत्रण कार्यक्रम व त्या अनुषंगिक बाबी.
७) आर.सी.एच.कार्यक्रम (कार्यक्रम अंमलबजावणी) आराखडयाच्या सर्व घटकाची अंमलबजावणी.
८) कार्यक्रमाच्या संदर्भात केंद्र शासनाशी समन्वय.
९) कार्यक्रमाचा आढावा व मूल्यमापन.
१०) पौगंडा (यौवन) (Adolsent) अवस्थेतील तरुणांना आरोग्य विषयक सेवा पुरविणे
११) बालमृत्यूबाबत उपाययोजना
१२) माता बाल संगोपन विषयक मेळघाट भागातील कुपोषण
१३) Integrated Management of Neo-natal and Childhood Illness. (IMNCI)
१४) शालेय आरोग्य तपासणी
१५) राष्ट्रीय बाल स्वास्थ्य कार्यक्रम
१६) युनिसेफ
१७) आयुष
१८) राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानातील कंत्राटी अधिकारी /कर्मचारी यांच्या तक्रारी व चौकशी प्रकरणे
१९) बालधोरण व बाल हक्क आयोगासंबंधी प्रकरणे
२०) एन.यू.एच.एम. (NUHM)

२१) कॉल टू ॲक्शान कार्यक्रम

२२) टेलिमेडिसीन संबंधी सर्व बाबी

## कार्यासन आरोग्य-८(खरेदी कक्ष)

१) आरोग्य सेवा संचालनालयांतर्गत सर्व रुग्णालयांसाठी औषधे, यंत्रसामग्री व साधनसामग्री यांची खरेदी करण्यासंदर्भात धोरण निश्चित करणे.

२) आरोग्य विभागासाठी स्वतंत्र दरकरार करणे.

३) खरेदीच्या अनुषंगाने उद्भवणारी इतर प्रकरणे.

४) रुग्णालयांना पुरवठा करावयाच्या औषधांच्या प्रचलित कार्यपध्दतीमध्ये सुधारणा करणे

५) रुग्णालय वगळून अशासकीय संस्थांची रुग्णालये इ. आरोग्य संस्थांना आयात प्रमाणपत्र देणे.

६) सीमाशुल्क करमाफीसाठी प्रमाणपत्र देणे

## कार्यासन - राकावि-२

१) राज्य कामगार विमा योजना संबंधीच्या धोरणात्मक बाबी.

२) पदनिर्मिती, अस्थायी पदे पुढे चालू ठेवणे.

३) यंत्रसामुग्री, वाहन खरेदी व पुरवठा/औषधे खरेदी प्रकरणे/औषधी खरेदी दरकरार.

४) राज्य कामगार विमा योजना संचालनालयातील सर्व संबंधित समित्यांच्या अहवालाची छाननी करणे.

५) महात्मा गांधी मेमोरियल हॉस्पिटलशी संबंधीत सर्व बाबी.

६) राज्य कामगार विमा योजने संबंधात लेखा परिक्षण अहवाल/ बांधकाम व दक्षता पथकाशी संबंधीत बाबी/ ग्राहक तक्रार मंच प्रकरणे व अनुषंगिक संकीर्ण बाबी.

८) अधिकारी /कर्मचारी संघटनांना मान्यता देणे व त्यांच्या मागण्या.

९) विमा कामगारांच्या वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपूर्तीची प्रकरणे व कालबाहय दावे.

१०) विस्तार सेवा दवाखाने/विशेषज्ञ केंद्रे/रा.का.वि.संबंधी नवीन रुग्णालये सुरु करणे.

११) शासकीय निवासस्थान/घरभाडे/रुग्णालयाकरिता/सेवा दवाखान्याकरिता/भाडयाने घेतलेल्या जागाबाबतची प्रकरणे.

१२) खाजगी स्वयंसेवी संस्थांना अनुदान व त्याच्यांशी संबंधित सर्व प्रकरणे (कुटुंब कल्याण कार्यक्रमासाठी देण्यात येणारे अनुदान वगळून)

१३) वैद्यकीय खर्चाची प्रतिपूर्ती/महाराष्ट्र राज्य सेवा (वैद्यकीय देखभाल) नियम १९६१ ची अंमलबजावणी व सुधारणा.

१४) वैद्यकीय खर्च प्रतिपूर्तीसंदर्भात खाजगी रुग्णालयांना शासन मान्यता देणे.

१५) मंत्रालयीन इतर विभागाकडू विशेष बाब म्हणून प्राप्त झालेली वैद्यकीय खर्च प्रतिपूर्ती प्रकरणे.

## कार्यासन - कुटुंब कल्याण

१) युएनएफपीए सहाय्यित बॉर्डर डिस्ट्रीक्ट प्रकल्प संबंधित बाबी

२) अर्बन आरसीएच संबंधित सर्व बाबी (युएनएफपीए सहाय्यित वर्धा आरएच प्रोजेक्ट)

३) जर्मन सहाय्यित बेसिक

४) युरोपियन कमिशन सहाय्यित सेक्टर इन्व्हेस्टमेंट कार्यक्रम.

५) केंद्र पुरस्कृत जननी सुरक्षा योजना

६) सावित्रीबाई फुले कन्या कल्याण योजना

७) आरोग्य व कुटुंब कल्याण धोरणाशी संबंधित बाबी व कार्यक्रमाचे मूल्यमापन.

८) आदिवासी भागासाठी नवसंजीवनी योजनेंतर्गत मातृत्व अनुदान योजना व दाई बैठक योजना, पाडा स्वयंसेवक योजना

९) लोकसंख्या धोरण

१०) राज्य संकीर्ण निधी

११) पुरुष नसबंदी, स्त्री नसबंदी शस्त्रक्रिया व त्यामुळे होणाऱ्या गुंतागुंती व मृत्यूचे प्रकरण.

१२) कुटुंब कल्याण कार्यक्रमाखालील अस्थाई पदांना मुदतवाढ देणे.

१३) पोलिओ निर्मूलन कार्यक्रम व त्यांचेशी संबंधित इतर कार्यक्रम/सार्वत्रिक लसटोचणी कार्यक्रम

१४) प्रसवपूर्व गर्भलिंगनिदान तंत्र अधिनियम, १९९४

१५) कुटुंब कल्याण कार्यक्रमासाठी देण्यात येणारे अनुदान

१६) कुटुंब कल्याण कार्यक्रमाशी संबंधित सर्व प्रशासकीय बाबी, लेखा परिक्षण अहवाल व स्वयंसेवी संस्थांचे कर्मचारीवर्ग व अनुषंगिक बाबीं.

१७) जन्ममृत्यु नोंदणी कायद्याच्या अनुषंगाने उद्भवणाऱ्या बाबी.

१८) महाराष्ट्र विवाह मंडळाचे विनियमन व विवाह नोंदणी कायदा तसेच भारतीय ख्रिश्चन विवाह कायदा १८७२

१९) जीवनविषयक आकडेवारी, ब्युरोच्या सर्व प्रशासकीय बाबीं.

२०) संघटनात्मक सुविधा-प्रसूती पश्चात केंद्र, नागरी कुटुंब कल्याण केंद्रे, नागरी आरोग्य संस्था, निर्बिजीकरणासाठी राखीव खाटा.

२१) कुटुंब कल्याण कार्यक्रमाच्या इतर कार्यासनामध्ये समन्वयाच्या व संकीर्ण बाबी

## विधी कक्ष

१) विभागातील सर्व न्यायालयीन प्रकरणी कायदेविषयक अभिमत देणे

२) विभागातील सर्व न्यायालयीन प्रकरणी परिच्छेदनिहाय अभिप्रायांची छाननी करुन अभिप्राय देणे.

३) न्यायालयात शपथपत्र दाखल करण्यास मदत करणे.

४) विभागातील सर्व न्यायालयीन प्रकरणासाठी नोडल ऑफिसर

५) विभागातील न्यायालयीन प्रकरणातील समन्वय.

## निवडमंडळ

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट-अ संवर्गातील वैद्यकीय अधिकारी पदभरतीसाठी उमेदवारांची निवड करणे.

-----

**१. आरोग्य सुविधा**

भारतीय घटनेच्या मार्गदर्शक तत्वानुसार नागरीकांचे आरोग्य संवर्धन हे कल्याणकारी राज्य शासनाचे कर्तव्य आहे. सर्वसाधारणपणे सामान्य नागरीकास आजारी असल्यास त्यास बरे करणे एवढाच मर्यादित दृष्टीकोन सार्वजनिक आरोग्य सेवेचा नसून नागरीकांच्या शारिरीक स्थितीबरोबरोच त्यांचे मानसिक व सामाजिक स्थितीसुध्दा निरोगी व निकोप राहील अशी परिस्थिती निर्माण करणे हे सुध्दा आहे. जनजीवनाच्या अन्न, पाणी व वस्त्र या मूलभूत गरजांबरोबरच वैद्यकीय सेवा पुरविणे ही आजच्या काळात मुलभूत गरजेचा एक भाग बनत चालली आहे.

आरोग्य हे अनुवंशिकता, बाहय वातावरण, सामाजिक स्थिती व आर्थिक स्थिती यावर अवलंबून असते. आरोग्य संवर्धनासाठी चांगल्या आहार सवयी, वैयक्तीक स्वच्छता, परिसर स्वच्छता, व्यसनमुक्त राहणीमान इत्यादी गोष्टी आपण होऊन अंगी बाळगणे आवश्यक आहे.

सार्वजनिक आरोग्य ही सुराज्याच्या कल्पनेची एक महत्वाची बाब आहे. महाराष्ट्र राज्याच्या आरोग्य विभाग खात्यावर या राज्यातील लोकांच्या आरोग्याची रुग्णालयात दिल्या जाणाऱ्या उपचारांची जबाबदारी आहे. आरोग्य सेवा सुसुत्रताबध्दरित्या पुरविण्यासाठी व त्यावर नियंत्रण ठेवण्यासाठी (१) आरोग्य सेवा संचालनालय, (२) राज्य कामगार विमा योजना आयुक्तालयांची निर्मिती करण्यात आलेली आहे.

आरोग्य सेवा संचालनालया मार्फत राज्यात खालील प्रमाणे त्रिस्तरावर आरोग्य सेवेची प्रभावी अंमलबजावणी करण्यात येते.

**अ) राज्यात विशिष्ट आरोग्य कार्यक्रम राबविण्यासाठी स्वतंत्र कार्यालय प्रमुखांची कार्यालये स्थापित करण्यात आलेली आहेत. सदरील कार्यालये पुढीलप्रमाणे आहेत.**

**१) अतिरिक्त संचालक आरोग्य सेवा (मानसिक आरोग्य), मुंबई.**

१) राष्ट्रीय मानवी हक्क आयोगाच्या मार्गदर्शक तत्वानुसार सर्व प्रादेशिक मनोरुग्णालयात सेवासुविधा पुरविणे

२) राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान कार्यक्रमांतर्गत सर्व प्रादेशिक मनोरुग्णालयात रुग्ण समिती स्थापन करुन उपलब्ध निधीद्वारे राष्ट्रीय मानसिक आरोग्य कार्यक्रम राबविणे.

३) राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य कार्यक्रमांतर्गत पुनर्वसन प्रकल्प कार्यक्रमांतर्गत व्यवसायोपचाराचे बळकटीकरण करणे

**२) अतिरिक्त संचालक आरोग्य सेवा ( राज्य कुटुंब कल्याण कार्यक्रम ) पुणे**

देशात कुटुंब कल्याण हा कार्यक्रम सन १९५२पासून सुरु करण्यात आला आहे. तसेच महाराष्ट्र राज्यात हा कार्यक्रम १९५७पासून शासकीय पातळीवर सुरु झाला. केंद्र शासनाने आखून दिलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार पूर्णपणे केंद्र शासनाने केलेल्या आर्थिक तरतुदीतून हा कार्यक्रम राबविण्यात येतो.

राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान अंतर्गत प्रजनन आणि बाल आरोग्याच्या सेवा या कार्यक्रमातून दिल्या जातात व त्या अनुषंगाने जन्मदर,बालमृत्यूदर,माता मृत्यू दर व मृत्यु दरात घट करण्याचे प्रयत्न केले जात आहेत. सार्वजनिक आरोग्य विभागाच्या नागरी व ग्रामीण क्षेत्रात प्रस्थापित असलेल्या आरोग्य सेवा यंत्रणेद्वारे कुटुंब नियोजनाच्या मुख्यत: पाच पध्दतीच्या सेवा/साधने लोकांना देण्यात येतात. यामध्ये पुरुष शस्त्रक्रिया,स्त्री शस्त्रक्रिया,स्त्रीयांसाठी तांबी आणि तोंडावाटे घेण्याच्या संतती प्रतिबंधक गोळया पुरुषांसाठी निरोध यांचा समावेश आहे. यामध्ये एन.एस.व्ही.व इमर्जन्सी कॉन्ट्रासेप्टीव्हचा अंतर्भाव करण्यात आला आहे. संपूर्ण राज्यात हा कार्यक्रम ३३जिल्हा परिषदा व २३ महानगरपालिका मार्फत राबविला जातो. या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीकरिता दर वर्षी केंद्र शासनातर्फे देण्यात येणा-या उदिष्टांची पध्दत बदलून १९८६-८७ या वर्षापासून हा कार्यक्रम केंद्रशासनाच्या मार्गदर्शक तत्वानुसार संपूर्ण राज्यात स्वयं उद्दिष्ट तत्वावर राबविण्यात येत आहे.

सदरहु कार्यक्रम आरोग्य खात्याचे सचिव व आयुक्त ( कुक) यांचे मार्गदर्शनाखाली राबविला जातो. त्यांच्या आदेशाप्रमाणे व मार्गदर्शनाप्रमाणे राज्य कुटुंब कल्याण कार्यालय,पुणे कुटुंब कल्याण कार्यक्रम राबविते. जिल्हा कुटुंब कल्याण कार्यालये, शहर कुटुंब कल्याण कार्यालये, स्वयंसेवी संघटना, महिला संघटना व खाजगी वैद्यकीय अधिकारी अशा अनेक संस्थांद्वारे शहरी व ग्रामीण भागात कुटुंब कल्याण कार्यक्रम राबविण्यात येतो.

**(३ सहसंचालक आरोग्य सेवा (हिवताप,हत्तीरोग व जलजन्यरोग) पुणे.**

महाराष्ट्र राज्यात १९५३ ते १९५८ या कालावधीत राष्ट्रीय हिवताप नियंत्रण योजना (NMCP) कार्यान्वित होती. त्यानंतर १९५८ मध्ये योजनेचे राष्ट्रीय हिवताप निर्मुलन योजनेत (NMEP) रुपांतर झाले. परंतु १९६५ नंतरच्या काळात राज्यातील हिवतापाचे प्रमाणात वाढ झाल्याने १९७७ पासून राज्यात हिवतापाच्या सुधारित योजनेची (MPO) अंमलबजावणी सुरु झाली.

**सुधारित योजनेची उददीष्टे :-**

१.हिवताप रुग्णांचे प्रमाण कमी करणे.

२.हिवतापाने होणारे मृत्यू टाळणे.

३.औद्योगिक व शेतकी कार्यावर हिवतापाचा परिणाम होऊ न देणे.

४.आतापर्यंत मिळविलेले यश टिकविणे.

**साथरोग नियंत्रण :-**

जलजन्य आजारांचे उद्रेक टाळण्यासाठी प्रतिबंधात्मक व नियंत्रणात्मक उपाययोजना करणे.

जिल्हास्तरीय आरोग्य यंत्रणेस वेळोवेळी आवश्यक त्या मार्गदर्शक सूचना देणे.

पाणी गुणवत्ता नियंत्रण.

ब्लिचिंग पावडर गुणवत्ता नियंत्रण.

जलजन्य आजाराचे रुग्ण व मृत्यू कमी करण्यासाठी प्रयत्न करणे.

जलजन्य आजार टाळण्यासाठी सर्वसामान्य जनतेचे आरोग्य शिक्षण.

पाणीपुरवठा विभाग, ग्रामविकास आणि नगर विकास विभागाशी आंतरविभागीय समन्वय ठेवणे.

**राष्ट्रीय किटकजन्य रोग नियंत्रण कार्यक्रमाची उदिदष्टे :-**

हिवताप,डेंगीताप,जे.ई.ने होणा-या मृत्युचे प्रमाण ५० टक्के कमी करणे व रुग्णसंख्या नियंत्रणात ठेवणे. सन २०१५ पर्यंत बाहयलक्षणेयुक्त हत्तीरोगाचे निर्मुलन करणे.

**योजनेची कार्यपध्दती :-**

**सहसंचालक** आरोग्य सेवा (हिवताप, हत्तीरोग व जलजन्य आजार) पुणे हे राज्यस्तर कार्यक्रम प्रमुख आहेत व ते सर्व योजनेवर नियंत्रण ठेवतात. सहसंचालक आरोग्य सेवा (हिवताप,हत्तीरोग व जलजन्य आजार)पुणे यांना सहाय्यक संचालक,आरोग्य सेवा (हत्तीरोग) पुणे व राज्य किटक शास्त्रज्ञ सहाय्य करतात. त्याचप्रमाणे प्रादेशिक स्तरावर सहाय्यक संचालक,आरोग्य सेवा (हिवताप) व जिल्हा स्तरावर जिल्हा हिवताप अधिकारी हे सहाय्य करतात.

**४) सहसंचालक आरोग्य सेवा (कुष्ठरोग व क्षयरोग) पुणे**

सहसंचालक आरोग्य सेवा(कुष्ठरोग),पुणे यांचेकडे क्षयरोग कार्यक्रमाची अतिरिक्त जबाबदारी सोपविण्यात आली असून पदनामाचे रुपांतर सहसंचालक आरोग्य सेवा (कुष्ठरोग व क्षयरोग) पुणे असे करण्यात आले आहे. राज्याचे (कुष्ठरोग) निर्मुलनाचे (सर्वकष तांत्रिक व प्रशासकीय) काम पाहतात व त्यांचे कामात सहाय्यक संचालक आरोग्य सेवा (कुष्ठरोग) मुख्यालय हे मदत करतात.

कुष्ठरोग समस्येचे परिणाम जाणून घेणे व निरनिराळया केंद्रांनी केलेल्या कामाचे मूल्यमापन करणे याकरिता एक नमूना पाहणी व मूल्यांकन पथक स्थापन करण्यात आले आहे. आदिवासी भागातील कुष्ठरोग

समस्येची व्याप्ती जाणून तेथील कामाचे मूल्यमापन करण्याकरिता क्षेत्रीय कुष्ठरोग पथक (आदिवासी) स्थापन करण्यात आलेले आहे. या दोन्ही पथकाचे प्रमुख सहाय्यक संचालक,आरोग्य सेवा वर्ग-१ दर्जाचे अधिकारी आहेत. उपसंचालक प्रभारी मंडळ हे त्यांच्या भागातील कर्मचा-यांच्या प्रशासकीय व आर्थिक कामावर नियंत्रण ठेवतात. तसेच तांत्रिक कामावर देखरेख करण्याकरिता प्रत्येक जिल्हयाला सहाय्यक संचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग) नेमलेले आहेत. जिल्हा आरोग्य अधिकारी,जिल्हा परिषद हेसुध्दा हा कार्यक्रम जिल्हयातील ग्रामीण भागात राबवितात.

**५ )सहसंचालक (अंधत्व निवारण कार्यक्रम ) मुंबई-:**

**१) अतिरिक्त संचालक आरोग्य सेवा -:**

राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रम १९७६सालापासून सुरु करण्यात आला असून ११ व्या पंचवार्षिक योजनेचे शेवटी (२०१२) अंधत्वाचे प्रमाण ०.८ टक्के आणण्याचे उददिष्टे असून २०२० पर्यंत हे प्रमाण ०.३पर्यत आणावयाचे आहे (२००१-०३) मध्ये अंधत्वाचे प्रमाण १.१टक्के व (२००६-२००७) मध्ये हे प्रमाण १ टक्का होते.

**६)उपसंचालक आरोग्य सेवा (गलगंड) मुंबई-:**

भारत सरकारने सन १९९२मध्ये/ राष्ट्रीय गलगंड नियंत्रण या कार्यालयाचे नाव बदलून/राष्ट्रीय आयोडिन न्यूनता विकार नियंत्रण कार्यक्रम असे केलेले आहे. शरीरातील आयोडिनच्या न्यूनतेमुळे गलगंड क्रिटीनिझम व शरीराची वाढ खुंटणे यासारख्या स्थिती संभवतात. गळयासमोरील फुलपाखराच्या आकाराच्या थॉयरॉईड ग्रंथीची वाढ होते त्यालाच गलगंड म्हणतात.

राज्यात २३ जिल्हांमध्ये राष्ट्रीय आयोडीन न्यूनता विकार नियंत्रण कार्यक्रमांची अंमलबजावणी सुरु आहे.

**ब) प्रादेशीक कार्यालये**

आरोग्य सेवेच्या अमंलबजावणीसाठी राज्यातील जिल्हातील खालील प्रमाणे आठ विभागात विभागणी करण्यात आलेली आहे.

१. उपसंचालक आरोग्य सेवा, मुंबई मंडळ, ठाणे

२. उपसंचालक आरोग्य सेवा, पुणे मडळ,पुणे

३. उपसंचालक आरोग्य सेवा,नाशिक मंडळ,नाशिक

४. उपसंचालक आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर

५. उपसंचालक आरोग्य सेवा,लातूर मंडळ,लातूर

६. उपसंचालक आरोग्य सेवा, अकोला मंडळ, अकोला

७. उपसंचालक आरोग्य सेवा,नागपूर मंडळ, नागपूर

८. उपसंचालक आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळ, औरंगाबाद

क) **जिल्हास्तर :-** यामध्ये सर्व जिल्हा रुग्णालये व जिल्हा आरोग्य अधिकारी कार्यालये आणि /अ मध्ये नमूद कार्यक्रम प्रमुखांच्या अंतर्गत कार्यालये यांचा समावेश होतो. जिल्हात आणि जिल्हातील आरोग्य सेवा आणि कार्यक्रम यांचेवर प्राथमिक देखरेख ठेवण्याची व जिल्हातील आरोग्य व्यवस्था सुरळीत पार पाडावयाची महत्वाची जबाबदारी या स्तरावर आहे.

**ड) तालुका/गावस्तर-:** यामध्ये सर्व उपजिल्हा रुग्णालये,ग्रामीण रुग्णालये, प्राथमिक आरोग्य केंद्र, प्राथमिक आरोग्य पथक,उपकेंद्र यांचा समावेश होतो, आरोग्य सेवेचे हे टोक असून तळागाळातील जनतेपर्यंत आरोग्य सेवा प्रभावीपणे पोहोचवण्याचे व राबविण्याचे कार्य या संस्थांमार्फत केले जाते.

आरोग्य सेवा संचालनालय हे प्रामुख्याने वैद्यकीय सहाय्य, संसर्गजन्य रोगाचे नियंत्रण, कुटुंब कल्याण, माता व बाल संगोपन, प्रदुषिकरण प्रतिबंधित स्वच्छता, सकस आहार सेवा आणि आरोग्य शिक्षण व संपर्क, आरोग्य आकडेवारी व संशोधन, सार्वजनिक प्रयोगशाळेद्वारे निरीक्षणे नोंदणे, समाजाच्या प्राथमिक आरोग्याची काळजी हा हेतू लक्षात घेऊन सार्वजनिक आरोग्य या विभागाची प्रमुख्य उद्दिष्टये ठरविण्यात आली आहेत.

(१) रोगांचे प्रतिबंध व नियंत्रण

(२) रुग्णालय व दवाखाने व नागरी आरोग्य सेवा

(३) कुटुंब कल्याण / माता बाल संगोपन

(४) आहार विषयक सल्ला

(५) आरोग्य शिक्षण

साथीच्या रोगांना प्रतिबंध व त्याचे नियंत्रण करणे हा सार्वजनिक आरोग्य सेवेचा एक अत्यंत महत्वाचा कार्यक्रम आहे. गेल्या २५ वर्षात निरनिराळया नियंत्रण उपाययोजना अंमलात आणल्याने देवी या रोगाचे समूळ उच्चाटन झाले असून नारु या रोगाचेही जवळपास पुर्ण उच्चाटन झाले आहे. तसेच प्लेग, पटकी, हिवताप, कुष्ठरोग व क्षयरोग हे अंशत: आटोक्यात आले आहेत. अवर्षण/ पूर/भुकंप या सारख्या आकस्मिक संकटांचा मुकाबला करण्यासाठी व इतर प्लेगसदृश्य रोगांचे उच्चाटन करण्यासाठी राज्यात प्रतिबंधत्माक/ उपचारात्मक कार्यक्रम जारी ठेवणे हे आरोग्य संचालनालयाचे अविभाज्य कार्य ठरले आहे. शासनाने खालील आरोग्य कार्यक्रम महाराष्ट्रात कार्यान्वित केले आहेत-:

(१) राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रम.

(२) राष्ट्रीय हिवताप नियंत्रण कार्यक्रम.

(३) राष्ट्रीय हत्तीरोग नियंत्रण कार्यक्रम.

(४) प्लेग प्रतिबंधक संघटना

(५) साथरोग नियंत्रण कार्यक्रम.

(६) नारु निर्मूलन कार्यक्रम

(७) कुष्ठरोग नियंत्रण कार्यक्रम

(८) क्षयरोग नियंत्रण कार्यक्रम

(९) राष्ट्रीय आयोडीन न्युनता विकार नियंत्रण कार्यक्रम.

निवारक उपचाराकडून प्रतिबंधक उपचारावर व शहराकडून ग्रामीण विभागावर वाढता भर दिला आहे. राज्यातील ग्रामीण जनतेला ज्या खाली संस्थामार्फत आरोग्य सेवा पुरविण्यात येतात त्या खालीलप्रमाणे:-

१) आरोग्य उपकेंद्रे

२) प्राथमिक आरोग्य केंद्रे

३) ग्रामीण रुग्णालये / उपजिल्हा रुग्णालये.

सदर प्रध्दतीस संदर्भ सेवा समजण्यात येते आणि ग्रामीण रुग्णालयातील उपचारानंतर आवश्यकतेनूसार रुग्णास जिल्हा रुग्णालयाकडे पाठविले जाते. राज्यात कार्यरत असलेल्या आरोग्य संस्थाची संख्या व क्षमता याची माहिति परिशिष्ठ-एक मध्ये देण्यात आली आहे.

**२) राजीव गांधी जीवनदायी योजना:-**

दारिद्रय रेषेखालील व दारिद्रय रेषेवरील (रु.१ लक्ष पर्यंत वार्षिक उत्पन्न असलेल्या) शिधापत्रिकाधारक कुटुंबासाठी विमा कंपनीच्या सहभागाने राजीव गांधी जीवनदायी आरोग्य योजना राज्यात सुरु करण्यात आली असून पहिल्या टप्प्यात गडचिरोली,अमरावती,नांदेड,धुळे,सोलापूर,रायगड,मुंबई शहर व उपनर या आठ जिल्हांमध्ये राबविण्यांत आली आहे. दिनांक २१नोव्हेंबर २०१३ पासून योजना उर्वरित सर्व जिल्हांमध्ये सुरु करण्यांत आली आहे. सदर योजनेमध्ये दारिद्रय रेषेखालील पिवळी शिधापत्रिकाधारक कुटुंबाबरोबरच अत्योंदय अन्न योजना व अन्नपूर्णा शिधापत्रिका कुटुंबे आणि दारिद्रय रेषेवरील केशरी रंगाची शिधापत्रिकाधारक कुटुंबे ( शासकीय,निमशासकीय व आयकरदाते वगळून) ज्यांचे वार्षिक उत्पन्न रु.१ लक्ष पर्यंत आहे अशी कुटुंबे या योजनेचा लाभ मिळण्यास पात्र असतील. सदर लाभार्थी कुटुंबाचा विमा हप्ता शासनामार्फत भरण्यात येत आहे. सदर योजनेमध्ये लाभार्थी कुटुंबाचा वार्षिक रु.१.५० लक्ष पर्यंत खर्च अनुज्ञेय आहे व मुत्रपिंड प्रत्यारोपनासाठी रु.२.५० लक्ष पर्यंत खर्च अनुज्ञेय आहे. सदर योजना अंतर्गत ९७१ प्रकारच्या शस्त्रक्रिया व उपचार केले जातील. तसेच शस्त्रक्रियेनंतर १२१ फॉलोअप प्रोसिजर्स या योजनेअंतर्गत आहेत. सदर योजने अंतर्गत गुणवत्तापर्ण शासकीय व खाजगी रुग्णालयांमधून रुग्णांवर उपचार करण्यांत येणार आहेत. सदर योजना पूर्णपणे संगणकिय आहे.

**हृदयशस्त्रक्रिया विभाग-** हृदयशस्त्रक्रिया ही एक खर्चीक शस्त्रक्रिया असून सामान्य जनतेला खाजगी रुग्णालयांमध्ये जाऊन ही शस्त्रक्रिया करुन घेण्यासाठी मोठया प्रमाणावर खर्च करावा लागतो. यास्तव शासनाने कोल्हापूर, सातारा, सांगली तसेच आजूबाजूच्या तालुक्यातील गरीब ह्रदय रुग्णांना शस्त्रक्रिया करण्यासाठी कोल्हापूर येथे हृदयशस्त्रक्रिया विभाग सुरु करण्यास मंजूरी दिली व त्यानुसार ५ मे २००१ पासून सदर विभाग कार्यान्वित करण्यात आलेला आहे. आतापर्यंत या विभागामध्ये १,१५२ रुग्णांवर हदयशस्त्रक्रिया करण्यात आली असून ३,५६२ रुग्णांची ॲन्जीओग्राफी व ॲन्जीओप्लास्टी करण्यात आलेली आहे.

**कर्करोग नियंत्रण कार्यक्रम -:**कर्करोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत राज्यातील सर्व जिल्हा रुग्णालये व स्त्री रुग्णालयांमध्ये स्त्रीयांच्या गर्भाशयाच्या कर्करोगसंबंधीची पॅपस्मिअर चाचणी संबंधीचे प्रशिक्षण रुग्णालयातील वैद्यकीय अधिकारी व प्रयोगशाळा तंत्रांज्ञांना देण्यात आलेले आहे.

जिल्हा रुग्णालय, रत्नागिरी, भंडारा व अमरावती येथे/ एन्डोस्कोपी / सुविधा पुरविण्यात आलेली आहे. जिल्हा रुग्णालय, अकोला, बुलढाणा, चंद्रपूर, वर्धा येथे ब्रान्कोस्कोप पुरविण्यात आलेले आहेत.

प्रयोगशाळेमध्ये कर्करोगाचे अचूक निदान व्हावे यासाठी सर्व जिल्हा रुग्णालयांमध्ये / सिस्टोपॅथॉजी / विभाग सुरु करण्यात आलेली आहे.

**.३ मानवी अवयवांचे प्रतिरोपण -:**

मानवी अवयवाचे प्रतिरोपण अधिनियम, १९९४ हा कायदा दिनांक ४फेब्रुवारी १९९५ पासून राज्यात लागू करण्यात आला. त्या कायदयाची अंमलबजावणी करण्यासाठी दिनांक २३मार्च, १९९५ च्या अधिसूचनेन्वये संचालक, आरोग्य सेवा यांना सक्षम प्राधिकारी (Appropriate Authority) म्हणून घोषित करण्यात आले आहे. तसेच संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन यांचे अध्यक्षतेखाली एक प्राधिकरण समिती (Authorization Committee) नेमण्यात आली तसेच पुणे, नागपूर, औरंगाबाद, यवतमाळ व धुळे या ठिकाणी सुध्दा स्वतंत्रपणे (Authorization Committee) समिती नेमण्यात आली आहे.

मानवी अवयव प्रत्यारोपण कायद्यांतर्गत प्रत्यारोपण सुविधा व तज्ञ उपलब्ध असणाऱ्या रुग्णालयांना प्राधिकृत करण्यासाठी संचालक, आरोग्य सेवा महाराष्ट्र राज्य यांना शासनाने समुचित प्राधिकरण म्हणून नियुक्त केले आहे. त्यानुसार राज्यातील ५५ रुग्णालयांना किडणी रोपण शस्त्रक्रियेस मान्यता देण्यात आली आहे तसेच यकृत रोपन

शस्त्रक्रियासाठी १२ रुग्णालयांना मान्यता देण्यात आली आहे. त्याचप्रमाणे हृदयरोपनासाठी ६रुग्णालये, फुफ्फुस रोपनासाठी २ रुग्णालये, स्वादुपिंड रोपनासाठी १ रुग्णालय व स्त्रीबिजांडरोप ( ovary ) १ रुग्णालयास मान्यता देण्यात आली आहे. संस्थाची तपशिलवार माहिती परिशिष्ठ मध्ये नमूद करण्यात आली आहे.

**४. कुटुंब कल्याण कार्यक्रम**

**४.१ मानव विकास कार्यक्रम**

**ऐतिहासिक पार्श्वभुमी -**

राज्यातील १२ अतिमागास जिल्हयांचा मानव विकास निर्देशांक उंचावण्याकरिता नियोजन विभाग, शासन निर्णय, क्र.ममावि /२००६ - प्र.क्र. /२० का. १४१३ , दि. २९ जून २००६ अन्वये मानव विकास मिशनची स्थापना करण्यात आली होती. त्यानंतर सन २०१२-१३ पासून शासन निर्णय क्र. मा.वि.मि./२०१० प्र.क्र/८१ .का/१४१८ .मंत्रालय, मुंबई दिनांक १९ जुलै २०११ अन्वये मानव विकास कार्यक्रमाची व्याप्ती २२ जिल्हयांतील १२५ तालुक्यांपर्यंत वाढविण्यात आली. या योजने अंतर्गत निवड केलेले २२ जिल्हे पुढीलप्रमाणे आहेत :- ठाणे, रायगड, सिंधुदुर्ग, नाशिक, धुळे, नंदुरबार, जळगांव, जालना, परभणी, हिंगोली, बीड, नांदेड, बुलढाणा, अकोला, वाशिम, अमरावती, यवतमाळ, नागपुर, भंडारा, गोंदिया, चंद्रपुर, गडचिरोली.

नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. माविका- २०१२/प्र.क्र.२२/का. १४१८ दिनांक २६ एप्रिल २०१२ नुसार मानव विकास कार्यकमास सन१३-२०१२ मध्ये पुढे चालु ठेवण्याबाबत मान्यता देण्यात आली.

नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. माविका- २०१२/प्र.क्र.६९/का.,१४१८ दिनांक १२ जुलै २०१२ नुसार मानव विकास कार्यक्रमाचा लाभ अधिकाधिक लोकांना मिळावा या उद्देशाने हया कार्यक्रमाची १५ जिल्हयातील 'क' वर्ग नगरपालिका क्षेत्रात अंमलबजावणी सुरु केली आहे.

- **उद्दीष्टे -**

२२ जिल्हयातील १२५ तालुके व १५ जिल्हयातील ४३ 'क' वर्ग नगरपालिकांमध्ये मानव विकास निर्देशांक वाढविणे.

- **कार्यक्रमांतर्गत विविध योजना व उपक्रम -**
    - स्त्रीरोग तज्ञांकडुन गर्भवती महिलांची आरोग्य तपासणी करणे तसेच ० ते ६ महिने वयोगटातील बालकांची व स्तनदा मातांची तपासणी करणे व ६ महिने ते २ वर्षे वयोगटातील बालकांची तीन महिन्यातुन एकदा तपासणी करणे आणि औषधोपचार करणे.
    - अ.जा./अ.ज./ दारिद्रय रेषेखालील गरोदर महिलेला बुडीत मजुरीपोटी रु.८००/- गरोदरपणातील नवव्या महिन्यात देणे. ( भंडारा व अमरावती वगळून या जिल्हयांत इंदिरा गांधी मातृत्व अनुदान योजना लागू आहे.)
    - किशोरवयीन मुलींना पौगंडावस्थेतील आरोग्य व जीवन कौशल्ये विकसित करण्याबाबत प्रशिक्षण देणे. ( गोंदिया, गडचिरोली, नाशिक, अमरावती, नांदेड, बीड, नागपुर, बुलढाणा वगळून या जिल्हयांत (सबला योजना लागू आहे.)
- **अंमलबजावणी पध्दती -**

राज्य स्तरावर कार्यक्रमाची अंमलबजावणी व सनियंत्रण आयुक्त, मानव विकास आयुक्तालय, औरंगाबाद हे करतात. जिल्हाधिकारी यांना त्यांच्या जिल्हयातील मानव विकास कार्यक्रम अंतर्गत येणा-या बाबींना प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार दिलेले आहे. या कार्यक्रमातील आरोग्य विषयक सेवा ग्रामीण भागातील वैद्यकिय अधिकारी, प्राथमिक आरोग्य केंद्र व शहरी भागात ग्रामीण रुग्णालय उपजिल्हा रुग्णालयामार्फत दिल्या जातात. जिल्हा आरोग्य अधिकारी व जिल्हा शल्य चिकित्सक यांचेकडुन सनियंत्रण केले जाते.

- **निधी वितरण -**

**मानव** विकास कार्यक्रमाकरीता निधी वितरीत करतांना जिल्हाधिकारी, जिल्हा आरोग्य अधिकारी यांचेकडे निधी वितरीत करतात, जिल्हा आरोग्य अधिकारी यांचेकडुन जिल्हा शल्य चिकित्सक यांना निधीचे वाटप केले जाते, त्यांचेकडून वैद्यकिय अधिक्षकांना निधी वितरीत करण्यात येतो. जिल्हा आरोग्य अधिकारी वैद्यकीय अधिकारी प्राथमिक आरोग्य केद्रांना तालुका आरोग्य अधिका-यांच्या अधिपत्याखाली निधी वितरीत करतात. निधी ठेवण्यासाठी राष्ट्रीयकृत बँकांचे स्वतंत्र खाते उघडणे बंधनकारक आहे. रुपये १४,५००/- प्रति शिबीर अशा खर्चाने निधीचे वाटप केले जाते.

**सेवा देणा-या आरोग्य संस्था -**

मानव विकास कार्यक्रमांतर्गत शिबीरे प्राथमिक आरोग्य केंद्र व ग्रामीण रुग्णालय, उपजिल्हा रुग्णालय स्तरावर राबविली जातात.

- **अंमलबजावणी कालावधी व पध्दती -**

प्राथमिक आरोग्य केद्रांमध्ये प्रत्येक महिन्यात किमान चार शिबीरे आयोजित करण्यात येतात. शिबीरे आयोजनाबाबतची माहिती सर्व संबधित ग्रामपंचायतींच्या आरोग्य कर्मचारी यांचेमार्फत कार्यक्षेत्रातील लाभार्थ्यांना देण्यात येते. शिबीराच्या ठिकाणी स्त्रीरोगतज्ञ आणि बालरोग तज्ञ यांचेकडून लाभार्थ्यांची वैद्यकिय तपासणी व उपचार केले जातात, एक वेळचा अल्पोपहार लाभार्थ्यांना देण्यात येतो. गरोदर मातांचा व ६ महिन्यांपर्यंत स्तनदा मातांचा पाठपुरावा केला जातो. तसेच जोखमीच्या मातांना उपचार व संदर्भीत केले जाते व पाठपुरावा करण्यात येतो.

- **देण्यात येणारे लाभ/ सेवा -**

प्राथमिक आरोग्य केंद्राच्या ठिकाणी लाभार्थ्यांना ने-आण करण्याकरिता केंद्राच्या वाहनाचा वापर करता येतो. जेथे वाहन उपलब्ध नसेल त्या ठिकाणी वाहने भाडयाने घेणे, स्त्रीरोगतज्ञ व बालरोगतज्ञ यांना मानधन देणे, शिबीरामध्ये लाभार्थ्यांना एक वेळ अल्पोपहार देणे, औषधे व प्रयोगशाळा साहित्य आणि पेडांल व्यवस्था याकरीता अनुदान देण्यात येते. अ.जा./अ.ज./दारिद्रय रेषेखालील गरोदर मातांना बुडित मजुरीपोटी रु. ८००/-इतके अंशदान गरोदरपणाच्या नवव्या महिन्यात देण्यात येते.

**<u>४.२ वैद्यकिय गर्भपात अधिनियम १९७१</u>** (<u>MTP</u> Act, १९७१)

१) गर्भपात कायदा अधिनियम १९७१ अन्वये सुरक्षित व कायदेशीर गर्भपात करणे संबंधी नियम करण्यात आलेले आहेत. प्रशिक्षित वैद्यकीय अधिकारी यांनी जिल्हा समितीने मान्यता दिलेल्या केंद्रामध्येच गर्भपात केला पाहिजे, असा महत्वाचा यामधील उद्देश आहे.

२) सदर कायदा अन्वये २० आठवडयापर्यंत गर्भवती असलेल्या स्त्रीस खालील कारणास्तव गर्भपात करणेस परवानगी आहे-

अ) गर्भवती महिलेस तीच्या जीवास धोका किंवा मानसिक अगर आरोग्यास गंभिर दुखापत होत असल्यास.

ब) जन्मास येणा-या बालकास मानसिक किंवा शारिरीक व्यंग असल्यास जेणे करुन बालकास अंपगत्व येऊ शकते

क) सदर महिलेस बलात्कारामुळे गर्भधारण झाले असल्यास

ड) विवाहीत पती पत्नी यांचे कडून गर्भनिरोधक साहित्याचा अगर औषधांच्या निष्क्रीयतेमुळे गर्भधारणा झाली असल्यास गर्भपात करता येतो.

३) गर्भपात कायदा अन्वये सदर कायदयाचे उल्लंघन झाल्यास कमीत कमी २ वर्ष व जास्तीत जास्त ७ वर्ष पर्यंत कारावास होऊ शकते.

वैद्यकीय गर्भपात कायदयातंर्गत राज्यात २९०६गर्भपात केंद्रांना मान्यता देण्यात आली असून त्यापैकी ४७४ शासकीय व २४३२ खाजगी आहेत. ज्याठिकाणी रक्तपेढीची सुविधा उपलब्ध असते तेथे २० आठवडयापर्यंतचे गर्भपात

करण्यास मान्यता देण्यात येते. तर रक्त पेढी नसेल त्या ठिकाणी फक्त १२आठवडयापर्यंतचे गर्भपात करण्यास मान्यता देण्यात येते. कुटूंब कल्याण कार्यक्रमांतर्गत पुरविण्यात येणाऱ्या सुविधांची माहिती परिशिष्ट सहा मध्ये देण्यात आली आहे.

बॉम्बे नर्सिंग होम रजिस्ट्रेशन ॲक्ट १९४९ यु.डी.पी.एच. ॲड एच.ड सचिवालय, मुंबई शासन निर्णय क्र. एनएचएम११६१/३३९५/३९४९७ जी ,११ दिनांक १०मे, ,१९७३ अन्वये बॉम्बे नर्सिंग होम रजिस्ट्रेशन ॲक्ट १९४९ हा कायदा सर्व महाराष्ट्रासाठी लागू करण्यात आला असून दिनांक १५ जानेवारी २००५च्या शासन निर्णय क्रमांक संकीर्ण२००२// प्र.क्र.२२५/आ ४ प्रमाणे याची अधिसूचना काढण्यात आली आहे.

नर्सिंग होम/ खाजगी रुग्णालये अधिकृत, शासन मान्यता प्राप्त असणे आवश्यक आहे. राज्यातील प्रत्येक खाजगी नर्सिंग होम वैधमार्गाने व सुरळीतपणे चालविली जावीत त्याच्यावर सुयोग्य नियंत्रण करणे सुलभ व्हावे तसेच तेथे शिक्षित वैद्यकीय/निमवैद्यकीय कर्मचारी वर्ग, पुरेशा सोयी, आवश्यक यंत्रसामुग्री उपलब्ध आहे किंवा नाही. त्याचप्रमाणे सदर नर्सिंग होम आहे किंवा नाही जेणेकरुन त्याचा फायदा रुग्णांना योग्य प्रकारे होणार आहे किंवा नाही हयाची शहानिशा करण्यासाठी त्यांची नोंदणी करण्याचा प्रमुख हेतू आहे. या नोंदणीकरिता आवश्यक ते शुल्क आकारले जाते. तसेच या नोंदणीनंतर दर ५ वर्षानी पुनर्नोंदणी करणे बंधनकारक आहे.

**४.३स्त्री-भृण हत्या रोखण्यासाठी प्रसवपूर्व गर्भलिंग निदानतंत्र (लिंग निवडीस प्रतिबंध) कायदा १९९४**

१) गर्भधारणापूर्व व प्रसवपूर्व गर्भलिंगनिदान प्रतिबंध कायदा अधिनियम २००३ अन्वये गर्भधारणेपुर्वी व प्रसुतीपुर्वी गर्भाच्या लिंग तपासणीस व निवडीस प्रतिबंध असुन त्यासाठी उपलब्ध तंत्रज्ञानाचा गैरवापर करण्यास मज्जाव करतो जेणेकरुन गर्भलिंगनिदान व निवड करुन,गर्भ मुलीचा आहे म्हणुन गर्भपात होऊ नये यासाठी प्रयत्न करतो.

२) गर्भधारणापूर्व व प्रसवपूर्व गर्भलिंग निदानतंत्र ( लिंग निवडीस प्रतिबंध ) अधिनियम २००३ अंतर्गत सार्वजनिक आरोग्य विभाग मंत्रालय, मुंबई शासन अधिसूचना क्र.प्रचिनी/४२३/२००६ प्र.क्र.१५०/कु.क/२ दि. ५.३.२०११ अन्वये अधिक्रमित करुन महाराष्ट्र शासन उक्त अधिनियमाखाली दिलेली कर्तव्ये पार पाडण्यासाठी राज्य पर्यवेक्षकिय मंडळाची स्थापना करण्यात आली.

३) सार्वजनिक आरोग्य विभागाच्या शासन अधिसूचना क्र.प्रचिनी/२०११ प्र.क्र/९४ कु.क. २ दि. २६.०७.२०११ अन्वये आयुक्त (कुटुब कलयाण ) तथा संचालक, राष्ट्रीय ग्रामिण आरोग्य अभियान, मंबई यांना राज्य समुचित प्राधिकारी म्हणून नियुक्त करण्यात आलेले आहे.

४) गर्भधारणापूर्व व प्रसवपूर्व गर्भलिंग निदानतंत्र (लिंग निवडीस प्रतिबंध कायदा १९९४ सुधारीत २ ००३ ) पीसीपीएनडीटी अन्वये कायद्यातील तरतुदीचे उल्लंघन करणा-या विरुध्द फौजदारी गुन्हे समुचित प्राधिकारी यांचे मार्फत न्यायालयात दाखल करण्यात येतात. तसेच गर्भलिंग निदान करुन स्त्री-भृण हत्या करण्या-या वैद्यकीय व्यवसायीक दोषी आढळल्यास कायद्यातील कलम (१) २३ अन्वये प्रथम गुन्हयांस तीन वर्ष सश्रम कारावासाची शिक्षा व १०,००० ( दहा हजार रुपये ) दंड व पुन्हा दोषी आढळयास पाच वर्ष् सश्रम कारावासाची शिक्षा व ५०,०००/-(पंन्नास हजार रुपये) दंड आकारण्याची कायद्यामध्ये तरतूद आहे.

५) राज्यात स्त्री-भृण हत्या रोखण्यासाठी प्रसवपूर्व गर्भलिंग निदानतंत्र (लिंग निवडीस प्रतिबंध कायदा) १९९४ पीसीपीएनडीटी अतर्गत राज्यामध्ये सोनोग्राफी बनविणा-या व विक्रीकरणा-या कंपन्यांना राज्य समुचित प्राधिकारी यांचेकडे नोंदणी करण्याची सक्ती शासन परीपत्रक क्र. प्रचिनी-२००६/४२३/प्रक्र.१५०/ कु.क दि. ०७.०८.२०१२ रोजी निर्णयान्वये करण्यात आली आहे.

राज्यात स्त्री-भृण हत्या रोखण्यासाठी प्रसवपूर्व गर्भलिंग निदानतंत्र (लिंग निवडीस प्रतिबंध) कायदा १९९४ (पीसीपीएनडीटी) अंतर्गत राज्यामध्ये सोनोग्रॉफी मशिन बनविणाऱ्या व विक्री करणाऱ्या कंपन्यांना राज्य समुचित प्रधिकारी यांचेकडे नोंदणी करण्याची सक्ती करण्यात आली आहे. गर्भधारणापुर्व व प्रसवपूर्व गर्भलिंग निदानतंत्र (लिंग निवडीस प्रतिबंध) कायदा १९९४ (पीसीपीएनडीटी) कायद्याच्या तरतुदीचे उलंघन करणाऱ्यांविरुध्द फौजदारी न्यायालयात न्यायालयीन खटले दाखल करण्यात येतात. गर्भलिंग निदान करुन स्त्री-भृण हत्या करणाऱ्या वैद्यकीय अधिकाऱ्यांना व सश्रम कारावासाची शिक्षा करण्यात येते.

६) पीसीपीएनडीटी अंतर्गत नागरीकांना राज्यात तक्रार नोंदविण्यासाठी टोल फ्री क्रमांक १८००२३३४४७५ जाहिर करण्यात आला असून www.amchimulgi.gov.in या संकेतस्थळी कार्यान्वित करण्यात आले आहे. यात नोंदविलेल्या सर्व तक्रारीचे निराकरण करण्यात येते.

**४ .४ जननी शिशु सुरक्षा कार्यक्रम**

जननी सुरक्षा कार्यक्रमांतर्गत राज्यातील **सर्व जिल्हयांमध्ये** गरोदर माता, प्रसूत माता **व नवजात अर्भकांना आणि आजारी बालकास सार्वजनिक आरोग्य संस्थामध्ये संदर्भ सेवा, औषधे तसेच इतर तपासण्या, निदान व प्रसुती झालेल्या महिलांना आहार, रक्तसंक्रमण इत्यादी सेवा देण्यात येत आहेत.** यात सर्व मातांना तसेच प्रसूतीसाठीच्या कोणत्याही खेपेस गरोदर मातेस व ३० दिवसांच्या आतील नवजात अर्भकास सर्व प्रकारच्या आरोग्य विषयक सेवा मोफत देण्यात येतात. सार्वजनिक आरोग्य संस्थामध्ये सर्व प्रकारच्या सेवा देण्यात येतात. प्रत्येक जिल्हयात जननी शिशु सुरक्षा कार्यक्रमांतर्गत कॉल सेंटर कार्यान्वित असून त्याचा टोल फ्रि क्रमांक १०२ असा आहे (नाशिक-०२५३-२२३२२२१– क व सांगली - ०२३३ २६२४४४४ -वगळता व गडचिरोली टोल फ्रि क्रमांक १०५६) मोफत वाहतुक सेवेअंतर्गत लाभार्थ्यांनी वा त्यांच्या जवळच्या नातेवाईकांनी फोन केल्यास, जवळच्या आरोग्य केंद्रातून रुग्णवाहीका लाभार्थ्यांच्या घरी पाठविण्यात येते व लाभार्थीच्या सुरक्षित प्रसूतीसाठी आरोग्य संस्थेत आणले जाते. त्याचप्रमाणे आवश्यकता भासल्यास एका आरोग्य संस्थेतून दुस-या आरोग्य संस्थेत मोफत वाहतुक सेवा देण्यात येते. त्याचप्रमाणे प्रसूती पश्चात लाभार्थास घरी सोडविण्यासाठी मोफत वाहतुक सेवा देण्यात येते. गरोदर माता, प्रसूत माता यांना सार्वजिनक आरोग्य संस्थामध्ये मोफत प्रयोगशाळा तपासण्या, औषधोपचार, मोफत प्रसूती सिझेरियन सेक्शन, प्रसूत झालेल्या मातांना मोफत आहार, आवश्यकता भासल्यास मोफत रक्तसंक्रमण इत्यादी सेवा देण्यात येत आहेत. त्याचप्रमाणे १ वर्ष वयापर्यंतच्या आजारी बालकास नि:शुल्क प्रयोगशाळा तपासण्या, औषधोपचार, आवश्यकता भासल्यास मोफत रक्तसंक्रमण व मोफत वाहतुक सेवा पुरविण्यात येते.

**४.५ नियमित लसीकरण कार्यक्रम -**

बालकांमधील लसीकरणाद्वारे प्रतिबंध करता येणा-या आजारांचे प्रमाण व त्या आजारांमुळे होणारे मत्यू कमी करण्यासाठी नियमित लसीकरण कार्यक्रम सुरु करण्यात आलेला आहे. ऑक्टोबर १९७७ मध्ये लसीकरणाद्वारे प्रतिबंध करता येणा-या घटसर्प , डांग्या खोकला , पोलिओ व क्षयरोग , या पाच आजारांवर नियंत्रण् ठेवण्यासाठी विस्तारीत लस टोचणी कार्यक्रम ( विल्टो ) " सुरु करण्यात आला सन १९८५ व ८६ मध्ये " सार्वत्रीक लसीकरण' कार्यक्रम सुरु करण्यात आला .गोवर लसीचा समावेश सार्वत्रीक लसीकरण कार्यक्रमामध्ये करण्यात आला. नियमित लसीकरण कार्यक्रमाच्या वेळापत्रकामध्ये या रोगाच्या लसीचा समावेश राज्यात सन २००८-०९ मध्ये टप्प्या टप्प्याने करण्यात आला आता ही लस सर्व जिल्हयामध्ये लागू करण्यात आली आहे. नियमित लसीकरण कार्यक्रमात जापनिज इन्साफलायटिस या रोगाच्या सीचा समावेश अमरावती (मनपासह), यवतमाळ, नागपूर, भंडारा, वाशिम, गडचिरोली, लातूर आणि बीड या जिल्हयात करण्यात आला. महाराष्ट्रात लसीकरणाच्या वेळापत्रकामध्ये सन २०११ पासून गोवर लसीच्या दुस-या मात्रेचा समावेश करण्यात आला.

**विशेष वैशिष्टये -**

लसीकरणाद्वारे प्रतिबंध करता येणाऱ्या आजारासाठी लहान बालकांचे लसीकरण धनुर्वातासाठी गरोदर मातांचे लसीकरण

- नियोजित सत्र यामध्ये लसीकरण करणे
- लसीची क्ष्मता टिकविण्यासाठी शीतसाखळीचे व्यवस्थापन
- लसीकरणाची सुरक्षितता वाढविण्यासाठी सर्व जिल्हे व मनपा यांना अेडी सिरिजेंसचा पुरवठा करण्यात येतो.
- जैविक वैद्यकिय कचऱ्याची सुरक्षित विल्हेवाट
- वैद्यकिय अधिकारी व आरोग्य कर्मचारी यांचे नियमित प्रशिक्षण

- लसीकरणांतर्गत उद्भवणाऱ्या विपरीत प्रतिक्रियांचा आता आढावा घेण्यासाठी जिल्हा व राज्य स्तरावर अन्वेषण समितीची स्थापना
- लसीकरणांतर्गत उद्भवणाऱ्या विपरीत प्रतिक्रियांची माहिती नोंदविण्यासाठी विजीफलो या आंतरराष्ट्रीय ग्लोबल पोस्ट मार्केटिंग सर्व्हेलन्स ऑनलाईन सॉफ्टवेअरचा वापर

**४.६ पोलिओ निमुर्लन कार्यक्रम**

पोलिओ रोगाचे निर्मुलन करण्यासाठी राज्यात सन १९९५ पासून पल्स पोलिओ लसीकरण मोहिम राबविण्यात येत आहे. या मोहिमेमध्ये ० ते ५ वर्षे वयोगटातील बालकांना पोलिओची अतिरिक्त मात्रा पूर्वीचा लसीकरणाचा इतिहास विचारात न घेता देण्यात येते.

**पोलिओ निमुर्लन कार्यपध्दती –**

नियमित लसीकरण कार्यक्रमांतर्गत एक वर्षाच्या आतील बालकाला देय असणारे पोलिओचे एकूण ३ डोस देण्यात येतात.

- ० ते ५ वर्ष वयोगटातील बालकाला एखादा जरी बालकाला पोलिओचा जादाचा डोस दयावयाचे राहिल्यास त्यामुळे अन्य बालकांनाही पोलिओ रोगाचा धोका उद्भवू शकतो त्यामुळे प्रत्येक बालकाला पल्स पोलिओ मोहिमेत ज्यादाचे डोस मिळणे आवश्यक आहे.
- पोलिओ निमुर्लनाकरिता पोलिओचे संशयित रुग्ण शोधण्यासाठी अचानक लुळेपणा आलेल्या बालकाचे सर्व्हेक्षण करणे
- पोलिओ जोखीमग्रस्त भागात विशेष पल्स पोलिओ मोहिमांचे आयोजन करणे
- पोलिओ विषाणूचे तीन प्रकार आहेत पी-१, पी-२ व पी-३

**५. राष्ट्रीय आरोग्य कार्यक्रमः-**

१) राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रम
२) हिवताप व हत्तीरोग नियंत्रण कार्यक्रम
३) कुष्ठरोग नियंत्रण कार्यक्रम
४) क्षयरोग नियंत्रण कार्यक्रम
५) प्लेग प्रतिबंध संघटना
६) साथरोग नियंत्रण कार्यक्रम
७) नारु निर्मूलन कार्यक्रम
८) राष्ट्रीय आयोडिन न्युनता विकार नियंत्रण कार्यक्रम

**.५.१ हिवताप व हत्तीरोग नियंत्रण कार्यक्रम -:**

महाराष्ट्र राज्यात १९५३ते १९५८ या कालावधीत राष्ट्रीय हिवताप नियंत्रण योजना ( NMCP ) कार्यान्वित होती. त्यानंतर १९५८ मध्ये योजनेचे हिवताप निर्मुलन योजनेत (NMEP) रुपांतर झाले. परंतु १९६५ नंतरचे काळात राज्यातील हिवतापाचे प्रमाणात वाढ झाल्याने १९७७ पासून राज्यात हिवतापाच्या सुधारित योजनेची अंमलबजावणी सुरु झाली.

- हिवताप रुग्णांचे प्रमाण कमी करणे.
- हिवतापाने होणारे मृत्यू टाळणे.
- औद्योगिक व शेतकी कार्यावर हिवतापाचा परिणाम होऊ न देणे.
- आतापर्यंत मिळविलेले यश टिकविणे.

**५.२ राष्ट्रीय कुष्ठरोग निर्मुलन कार्यक्रम -:**

महाराष्ट्र राज्यात राष्ट्रीय कुष्ठरोग नियंत्रण कार्यक्रम सन १९५५-५६ साली पाहणी, शिक्षण व उपचार या एक उद्देशिय पध्दतीने राबविण्यास सुरवात झाली. सन १९८१ -८२ पासून प्रभावी औषधोपचाराचा समावेश असलेली बहुविध औषधोपचार पध्दती राज्यात टप्याटप्यात लागू करण्यात येऊन १९९५-९६ सालापर्यंत राज्यातील सर्व जिल्हे या योजनेतंर्गत आणण्यात आले. त्यामुळे सन १९८१- ८२ साली दर दहा हजारी कुष्ठरोगाचे प्रमाण ६२.४ वरुन माहे जानेवारी २०१२अखेर हेच प्रमाण १.०६ टक्के इतके कमी झाले आहे.

हा कार्यक्रम १००टक्के केंद्रशासन अनुदानित असून सदरील कार्यक्रमाचे सर्वसाधारण आरोग्य सेवेमध्ये एकत्रिकरण झाले आहे. महाराष्ट्र राज्यात हा कार्यक्रम राज्य शासन, जिल्हा परिषद, महानगरपलिका, नगरपालिका आणि स्वयंसेवी संस्था यांचे मार्फत राबविण्यात येत आहे.

**राष्ट्रीय कुष्ठरोग इलिमिनेशन उद्दिष्ट खालीलप्रमाणे-**

राष्ट्रीय कुष्ठरोग निर्मुलन कार्यक्रमाचे सर्वसाधारण आरोग्य सेवेत एकत्रिकरण राज्यातील ग्रामीण नागरी जनतेला पुढीलप्रमाणे आरोग्य संस्थेमार्फत कुष्ठरुग्णांना सेवा पुरविण्यात येतात.

**५.३राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रम-:**

राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रमांतर्गत ज्या कोणत्याही व्यक्तीच्या डोळयामध्ये मोतिबिंदू झाला असेल त्यावर मोफत मोतिबिंदू शस्त्रक्रिया, डोळयांचे इतर आजार उदा. काचबिंदू, मधुमेहामुळे होणारे नेत्र पटलावरील परीणाम तसेच इतर संसर्गजन्य डोळयांचे आजार यावरील उपचार व माहिती सर्व जिल्हा रुग्णालये, उपजिल्हा रुग्णालये व ग्रामीण रुग्णालयांमध्ये उपलब्ध होऊ शकते. या कार्यक्रमांतर्गत पुरविण्यात येणाऱ्या सेवा सुविधा यांची माहिती परिशिष्ठ सहा मध्ये देण्यात आली आहे.

**ग्रामीण विभाग,**

१) प्राथमिक आरोग्य केंद्र.
२) ग्रामीण रुग्णालये.
३) कुटीर रुग्णालये.

**शहरी विभाग,**

१) महानगरपालिका दवाखाने
२) नगरपालिका दवाखाने
३) सर्व सामान्य रुग्णालये
४) पर्यवेक्षकीय नागरी कुटुंब कल्याण पथक

**५.४सुधारित राष्ट्रीय क्षयरोग नियंत्रण कार्यक्रम -:**

महाराष्ट्र शासनाच्या सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अखत्यारितील आरोग्य सेवा संचालनालयामार्फत राज्यात विविध राष्ट्रीय आरोग्य कार्यक्रम राबविले जातात. त्यातील सुधारित राष्ट्रीय नियंत्रण कार्यक्रम असुन तो सहसंचालक, आरोग्य सेवा (क्षय व बीसीजी), पुणे या विभागाप्रमुख दर्जाच्या कार्यालयामार्फत राबविला जातो.

केंद्र शासनाच्या मार्गदर्शक तत्वानूसार हया कार्यक्रमाची अंमलबजावणी सध्या संपूर्ण राज्यभर सुरु झालेली आहे. या कार्यक्रमांतर्गत जनतेला क्षयरोग निदान व औषधोपचाराच्या मोफत सुविधा पुरविल्या जातात.

नविन बाहयरुग्णांपैकी तीन आठवडयापेक्षा जास्त कालावधीसाठी खोकला असणाऱ्या रुग्णांची थुंकी तपासणी व आवश्यकता असल्यास क्ष-किरण तपासणी करण्यात येते. क्षयरोगाचे निदान झाल्यास सदर रुग्णाला प्रत्यक्ष निरीक्षणाखाली अल्पमुदतीचा औषधोपचार मोफत देण्यात येतो.

**कार्यक्रमाची उद्दिष्टे**

१) कमीत कमी ९० % नविन थुंकी दुषित क्षयरुग्णांना बरे करणे व हा दर कायम राखणे.
२) अपेक्षित थुंकी दुषित रुग्णांपैकी किमान ९० % रुग्ण शोधणे व हा दर कायम राखणे.

क्षय रुग्णांच्या व्यवस्थापनासाठी सुधारित राष्ट्रीय क्षयरोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत सर्वसमावेक्षक आणि समाजघटकांवर आधारित असा प्रत्यक्ष निरीक्षणाखाली अल्पमुदतीचा औषधोपचार (डॉटस) हे धोरण राबविण्यात येते.

सुधारित राष्ट्रीय क्षयरोग नियंत्रण कार्यक्रमाचे पाच घटक

१) राजकीय आणि प्रशासकीय बांधीलकी.
२) स्पुटम मायक्रोस्कोपीसह रोग निदानाची योग्य व अचूक पध्दती.
३) रुग्णनिहाय खोक्यामध्ये चांगल्या दर्जाच्या औषधांचा सातत्याने पुरवठा.
४) प्रत्यक्ष निरिक्षणाखाली देण्यात येणारा औषधोपचार.
५) पध्दतीशीर संनियंत्रण व बांधीलकी.

प्रत्येक जिल्हयात कार्यक्रम अंमलबजावणी जिल्हा क्षयरोग अधिकारी यांच्या मार्फत तर महानगरपालिकामध्ये कार्यक्रम अंमलबजावणी शहर क्षयरोग अधिकारी यांच्या मार्फत केली जाते. त्यामुळे त्यांच्या कार्यक्षेत्रात सेवा मिळणेबाबत तक्रारी असतील तर त्याची दाद या अधिकाऱ्यांकडे मागावी. जर जिल्हा/महानगरपालिका प्रमुखांबाबत तांत्रिक स्वरुपाच्या तक्रारी असतील तर त्याबाबत सहसंचालक, आरोग्य सेवा (क्षय व बीसीजी), पुणे तथा राज्य क्षयरोग अधिकारी महाराष्ट्र यांच्याकडे दाद मागावी.

**५.५प्लेग प्रतिबंध कार्यक्रम-:**

साथरोग नियंत्रण कार्यक्रम, नारु निर्मूलन कार्यक्रम व राष्ट्रीय आयोडिन न्युनता विकार नियंत्रण कार्यक्रम या कार्यक्रमांची अंमलबजावणी दरवर्षी आरोग्य विभागाने ठरविलेल्या वेळापत्रकाप्रमाणे करण्यात येते. सर्व राष्ट्रीय आरोग्य कार्यक्रमाबाबत सेवा पुरविण्यास जबाबदार अधिकारी इत्यादींची माहिती परिशिष्ठ सात मध्ये दर्शविण्यात आली आहे. राष्ट्रीय एडस नियंत्रण कार्यक्रमाबाबतची माहिती परिशिष्ठ सात (ब) मध्ये दर्शविली आहे.

**५.६राष्ट्रीय गलगंड नियंत्रण कार्यक्रम-:**

भारत सरकारने सन १९९२मध्ये, राष्ट्रीय गलगंड नियंत्रण या कार्यालयाचे नाव बदलून राष्ट्रीय आयोडीन न्यूनता विकार नियंत्रण कार्यक्रम असे केलेले आहे. शरीरातील आयोडीनच्या न्यूनतेमुळे गलगंड क्रिटीनिझम व शरीराची वाढ खुटणे यासारख्या स्थिती संभवतात. गळयासमोरील फुलपाखराच्या आकाराच्या थॉयरॉईड ग्रंथीची वाढ होते त्यालाच गलगंड म्हणतात.

**६. राष्ट्रीय मानसिक आरोग्य कार्यक्रम**

मानसिक आजाराच्या संदर्भातील सामाजिक समस्येचे गांभीर्य जाणून केंद्र शासनाने ऑगस्ट १९८२मध्ये राष्ट्रीय मानसिक आरोग्य कार्यक्रमाची सुरुवात केली. या कार्यक्रमाव्दारे महाराष्ट्रातील खेडयापाडयातील सर्वसामान्य जनतेला लाभ व्हावा या स्तुत्य हेतूने या कार्यक्रमाची अंमलबजावणी राज्यातही सुरु करण्यात आली.

(१) मानसिक आरोग्य सेवा ही इतर आरोग्य सेवेबरोबर दूर खेडयापाडयात पोहचविणे.
(२) मानसिक आरोग्य सेवेतील निरनिराळी कामे व जबाबदाऱ्या योग्य प्रकारे नेमून देणे.
(३) सर्वसाधारणपणे आरोग्य सेवेमध्ये मानसिक आरोग्य सेवा एक अविभाज्य घटक बनविणे.
(४) या सर्व योजना सामाजिक विकासाच्या योजनेशी निगडित करणे.
(५) मानसिक आरोग्य सेवेत लोकांना सहभागी करुन घेणे, इत्यादी.

राज्यात पुणे, ठाणे, नागपूर व रत्नागिरी या चार ठिकाणी प्रादेशिक मनोरुग्णालये कार्यान्वित असून त्यात ५७५५ मनोरुग्णांची क्षमता आहे.

१) पुणे-२६०० खाटा २) ठाणे-१८५० खाटा ३) नागपुर-९४० खाटा ४) रत्नागिरी-३६५ खाटा

मनोरुग्णालयात मानसिक आरोग्य कायदा १९८७मधील तरतुदीस अनुसरुन मनोरुग्णांना दाखल करण्यात येते. मा. न्यायालयाच्या आदेशान्वये दारिद्रय रेषेखालील मनोरुग्णांना विनाशुल्क सेवा दिली जाते. प्रादेशिक मनोरुग्णालयांव्दारे बाहयरुग्ण सेवा, आंतररुग्ण सेवा, वैद्यकीय उपचार, प्रयोगशाळा तपासण्या, आहार, व्यवसाय उपचार इत्यादी सेवा पुरविण्यात येतात.

**७. जीवन अमृत सेवा योजना**

दि.१९ फेब्रुवारी, २०१३ रोजी मा. मुख्यमंत्री यांच्या हस्ते या योजनेचा शुभारंभ सातारा येथे करण्यात आला आहे. रुग्णास सुरक्षित व उच्च दर्जाचा रक्त पुरवठा प्राप्त होण्यामधील सामान्य जनतेच्या अडचणी दूर होण्याच्या दृष्टीकोनातून येथोचित वेळेत रक्त प्राप्त व्हावे या उद्देशाने दि.१९ फेब्रुवारी, २०१३ रोजी मा. मुख्यमंत्री यांच्या हस्ते जीवन अमृत सेवा योजना या योजनेचा शुभारंभ सातारा येथे करण्यात आला आहे. सदर योजनेद्वारे जिल्हा सामान्य रुग्णालयापासून १ तास किंवा ४० किलोमीटर अंतरावरील रुग्णालये व नर्सिंगहोम यांना रक्तपुरवठा करण्यात येईल. तसेच या योजनेचा लाभ घेण्यासाठी जिल्हयातील रुग्णालये तसेच नर्सिंगहोम यांना जिल्हा रक्तपेढीकडे नोंद करणे आवश्यक आहे.

**८.शालेय आरोग्य तपासणी कार्यक्रम**

शालेय आरोग्य कार्यक्रमाचा विस्तार करण्याचा दृष्टीकोन समोर ठेवून ०ते १८ वर्षे वयोगटातील मुलांचा समावेश असणाऱ्या राष्ट्रीय बाल स्वास्थ कार्यक्रम दि. ६ फेब्रुवारी, २०१३ रोजी ठाणे जिल्हयातील पालघर येथुन सुरु करण्यात आला. या योजनेअंतर्गत सुमारे १.९५ कोटी मुलांची तज्ञ पथकामार्फत सर्वव्यापी आरोग्य तपासणी होणार असून त्यामुळे सदृढ तरुण पिढी निर्माण होण्यासाठी मदत होणार आहे.

**९. माहिती शिक्षण व प्रसार (I E C)**

राज्यातील सर्व सामान्याचे आरोग्य संवर्धन करण्यासाठी शासनाकडुन सर्व पातळीवरुन विविध आरोग्य सेवा दिल्या जातात. शहरी अथवा ग्रामीण भागातील तळागाळापर्यंत दिल्या जात असलेल्या या सर्व उपलब्ध सेवा जनतेला माहिती व्हाव्यात म्हणून विविध माध्यमाव्दारे आरोग्य शिक्षण व संपर्काचे कार्य राज्य आरोग्य शिक्षण व संपर्क विभाग करीत आहे. यातून लोकांच्या शारिरीक, मानसिक आणि सामाजिक स्थितीत योग्य असा वर्तनात बदल घडवून त्यांनी या सेवा अंगीकाराव्यात म्हणून हा विभाग निरंतरपणे कार्य करीत आहे. या विभागाकडुन खालीलप्रमाणे सेवा राज्यस्तरावर आणि जिल्हास्तरावरुन पुरविण्यात येतात.

सामान्य उददिष्टे:-

१) लोकांनी स्वत:हून आरोग्य प्राप्त करुन घेण्यास त्यांना उद्युक्त करणे.
२) विविध आरोग्य कार्यक्रमाविषयी जनजागृती करुन लोकांचा उत्स्फूर्त प्रतिसाद मिळविणे.
३) आरोग्य व कुटुंब कल्याण विषयक सोयीचा लाभ घेण्यासाठी लोकांना प्रेरित करणे.
४) लोकांच्या आरोग्यविषयक वर्तनात बदल घडवून आणणे.

**१०. राज्य कामगार विमा योजना**

आरोग्य सुविधा व आरोग्य यंत्रणेबरोबरच राज्यातील विमाधारक कामगार व त्यांच्या कुटूंबियांकरिता कामगार राज्य विमा महामंडळ, नवी दिल्ली आणि राज्य शासन यांच्या संयुक्त विद्यमाने आरोग्य सुविधा पुरविण्यात येतात. यातील आरोग्य सेवा देण्याची जबाबदारी राज्य शासनाची असून, सदर सेवा संपूर्णत: विनामूल्य आहेत. या सेवेकरिता राज्य कामगार विमा योजनेची खालील १३ राज्य कामगार विमा योजना रुग्णालये व इतर सेवा संस्था कार्यरत आहेत -:

मुंबई विभाग -वरळी, अंधेरी, कांदिवली, मुलुंड, ठाणे, उल्हासनगर, वाशी व महात्मा गांधी स्मारक रुग्णालये, परेल, मुंबई येथील राज्य कामगार विमा योजना रुग्णालय

पुणे विभाग -औंध पुणे, औरंगाबाद, नाशिक व सोलापूर येथील राज्य कामगार विमा योजना रुग्णालये

नागपूर विभाग -नागपूर येथील राज्य कामगार विमा योजना रुग्णालये

सामान्य उददीष्टे -:

१) लोकांनी स्वत:हून आरोग्य प्राप्त करुन घेण्यास त्यांना उदयुक्त करणे.

२) विविध आरोग्य कार्यक्रमाविषयक सोयीचा लाभ घेण्यासाठी लोकांना प्रेरित करणे.

३) आरोग्य व कुटुंब कल्याण विषयक सोयीचा लाभ घेण्यासाठी लोकांना प्रेरित करणे.

४) लोकांच्या आरोग्य विषयक वर्तनात बदल घडवून आणणे.

**वैद्यकीय खर्च प्रतिपुर्तीबाबत -:**

विमा धारकाने तातडीच्या परिस्थितीत नजीकच्या खाजगी रुग्णालयात किंवा शासकीय /महानगरपालिका / शासन मान्य रुग्णालयात उपचार घेतल्यास त्यावरील वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपूर्तीसाठी /सा.आ.वि शासन निर्णय क्रमांक-एमएजी२००५/९/प्र.क्र.१/आरोग्य-३ ,दि.१९.०३.२००५ अन्वये कार्यवाही केली जात असून त्यात २७आजार व ५ गंभीर आजार मोडत असल्याने सदर आजारावरील खर्चही अनुज्ञेय ठरतो.

सदर वैद्यकीय खर्च प्रतिपूर्तीकरीता रुग्णाने संबंधित प्रभारी वैद्यकीय अधिकारी, सेवा दवाखाना / वैद्यकीय प्रशासन अधिकारी / वैद्यकीय अधिक्षक यांच्याकडे उपचार संपल्यानंतर वर्षाच्या आत प्रतिपुर्तीचे प्रकरण सादर करणे आवश्यक आहे. तसेच संबंधित कार्यालयाकडून प्राप्त नमुन्यातच सदर अर्ज सादर करणे विमाधारकास बंधनकारक आहे.

**राज्य कामगार विमा योजनेची व्याप्ती -:**

राज्य कामगार विमा योजना कायदा १९४८ च्या कलम १ ( (३) अन्वये कार्यरत असून ही योजना येथे १०व त्यापेक्षा अधिक कामगार असलेल्या व विद्युत शक्तीचा वापर करणाऱ्या आणि २० किंवा त्यापेक्षा अधिक कामगार असलेल्या परंतु विद्युत शक्तीचा वापर न करणाऱ्या कारखान्यांना तसेच उपहारगृहे, चित्रपटगृहे, वाहतूक संस्था, कापड दुकानदार इत्यादी व्यवसायांना ही योजना लागू आहे. ज्या कामगाराचा मासिक पगार रु.१५,०००/- पर्यंत आहे अशांना ही योजना लागू आहे.(शासन निर्णय दि.१.०५.२०१० अन्वये) सदर योजनेचा प्रारंभ महाराष्ट्रात प्रथम विदर्भ विभागातील नागपूर येथे दि.११.०७.१९५४ रोजी झाला. तद्नंतर ही योजना मुंबई (ऑक्टोबर १९५४) पुणे (ऑगस्ट१९६५) सोलापूर (नोव्हेंबर १९६३) आणि महाराष्ट्रात इतर १८शहरात सुरु करण्यात आली आहे. या योजनेखाली महाराष्ट्रात सध्या एकूण २३,२७,३११ नोंदणीकृत विमा कामगार व त्यांची ९३,०९,२४०कुटुंबिय यांचा समावेश आहे. या योजनेखाली सर्व विमा कामगारांना वैद्यकीय सुविधा उपलब्ध करुन देण्यात येते.

विमा रुग्णांना प्रथम पासूनच बाहयरुग्ण विभागातील उपचार, विशेषज्ञ उपचार आणि रुग्णालयीन उपचार घेण्याचा हक्क असतो. त्यांना व त्यांच्या कुटूंबियांसाठी उपलब्ध सुविधा खालील टप्प्यांमध्ये दिल्या जातात.

१) ज्यावेळेस कुटूंबास केवळ बाहयरुग्ण विभागात उपचार दिला जातो त्यास निर्बंधीत वैद्यकीय सेवा (Restricted medical care) असे म्हणतात.

२) ज्यावेळेस कुटूंबास विशेषज्ञाकडून उपचार दिला जातो त्यास विस्तारित वैद्यकीय सेवा (Extended Medical Care) असे म्हणतात.

३) ज्यावेळेस कुटूंबास रुग्णालयीन उपचार देखील दिले जातात त्यास संपूर्ण वैद्यकीय सेवा (full medical care) असे म्हणतात. महाराष्ट्रात अमरावती सोडून इतर ठिकाणी पूर्ण वैद्यकीय सेवेची (Full Medical Care) तरतूद केली आहे. अमरावती येथे फक्त निर्बंधित वैद्यकीय सेवा उपलब्ध आहेत.

## परिशिष्ठ -एक
## आरोग्य संस्था

| अ.क्र. | आरोग्य संस्था | संस्था | मंजूर खाटांची क्षमता |
|---|---|---|---|
| १ | आरोग्य उपकेंद्रे | १०,५७९ | -- |
| २ | प्राथमिक आरोग्य केंद्रे | १,८१६ | १०,८९६ |
| ३ | ग्रामीण रुग्णालये | ३७६ | १८,८०० |
| ४ | उप जिल्हा रुग्णालये | ७८ | |
| ५ | जिल्हा रुग्णालये | २३ | |
| ६ | सामान्य रुग्णालये | ४ | |
| ७ | स्त्री रुग्णालये | ११ | |
| ८ | मनो रुग्णालये | ४ | |
| ९ | क्षयरोग रुग्णालये | ५ | |
| १० | कुष्ठरोग रुग्णालये | ४ | |
| ११ | प्राथमिक आरोग्य पथके | ११६ | |
| १२ | फिरती आरोग्य पथके | ३८ | |
| १३ | आयुर्वेदिक दवाखाने | ४८१ | |
| १४ | ॲलोपॅथी दवाखाने | ६५ | |
| १५ | जिल्हा परिषद दवाखाने | २८ | |
| १६ | युनानी दवाखाने | ५३ | |
| १७ | नागरी दवाखाने | १२ | |
| १८ | तरंगते दवाखाने | ५ | |
| १९ | विभागीय संदर्भ सेवा रुग्णालये | २ | २०० |
| २० | इतर दवाखाने | २२ | |

## परिशिष्ठ – दोन
## कार्यपुर्तीचे वेळापत्रक
## आरोग्य सेवा

| आरोग्य संस्था प्रकार | देण्यात येणाऱ्या सुविधा | सेवा पुरविणारे जबाबदार अधिकारी / कर्मचारी | सेवा पुरविण्यासाठी समय मर्यादा | सेवा विहित कालावधीत पुरविली न गेल्यास ज्यांच्याकडे तक्रार करता येईल ते अधिकारी |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| आरोग्य उपकेंद्र | १) गरोदर मातांची नोंदणी /तपासणी व उपचार<br>२) सर्व प्रकारचे लसीकरण<br>३) लोहयुक्त गोळया व जीवनसत्वाचे वाटप | परिचारिका/ प्रसविका | वेळापत्रकानुसार दिलेल्या भेटीनंतर | तालुका आरोग्य अधिकारी |

| आरोग्य संस्था प्रकार | देण्यात येणाऱ्या सुविधा | सेवा पुरविणारे जबाबदार अधिकारी / कर्मचारी | सेवा पुरविण्यासाठी समय मर्यादा | सेवा विहित कालावधीत पुरविली न गेल्यास ज्यांच्याकडे तक्रार करता येईल ते अधिकारी |
|---|---|---|---|---|
| | ४) बाळंतपणाच्या सुविधा व प्रसुतीपश्चात सेवा<br>५) निरोध गर्भनिरोधक गोळयांचे वाटप व तांबी बसविण्याची सुविधा, आवश्यकतेनुसार गर्भपाताचा सल्ला<br>६) आरोग्य सेवा सत्रांचे आयोजन<br>७) हिवताप, अतिसार (क्षार व संजीवनी) न्युमोनिया व किरकोळ आजारात उपचार<br>८) मोतीबिंदूच्या रुग्णांची नोंदणी.<br>९) लैंगिक आजारावरील माहिती व उपचार,<br>१०) कुष्ठरोग व क्षयरोग यांचा शोध, उपचार व आरोग्य शिक्षण | | | |
| प्राथमिक आरोग्य केंद्र | १) किरकोळ आजारावरील उपचार.<br>२) गंभीर रुग्णांसाठी संदर्भ सेवा,<br>३) छोटया शस्त्रक्रिया,<br>४) श्वानदंश/सर्पदंश लस/उपचार<br>५) अपघात/न्याय वैद्यक प्रकरणे<br>६) रक्त/लघवी, थुंकी तपासणी,<br>७) बालकांना बीसीजी/पोलिओ/ट्रिपल पोलिओ/गोवर लस टोचणी व जीवनसत्वाची मात्रा.<br>८) गरोदर स्त्रियांना धनुर्वात प्रतिबंधक लस टोचणी व रक्तक्षय विरोधक गोळयांचे वाटप<br>९) कुटूंब नियोजनाच्या पध्दतीची माहिती देणे इतर स्त्रियांना साधन वाटप (निरोध) तोंडाने घ्यावयाच्या गर्भनिरोधक गोळया वाटणे व तांबी बसविणे.<br>१०) तापाच्या रुग्णांवर गृहभेट उपचार, हिवतापाचे रुग्ण शोध व गृहित उपचार "अ"जीवनसत्वाची मात्रा देणे.<br>११) मोतीबिंदू शस्त्रक्रिया, एडस रोगविषयी माहिती, सल्ला व आरोग्य शिक्षण | वैद्यकीय अधिकारी | आगमनानंतर विविक्षित दिवशी शिबीराच्या दिवशी | जिल्हा आरोग्य अधिकारी |
| ग्रामीण रुग्णालये | १) आंतररुग्ण व बाहयरुग्ण सेवा.<br>२) छोटया शस्त्रक्रिया<br>३) रक्त, लघवी, थुंकी व प्रयोगशाळेतील सर्व चाचण्या/तपासण्या.<br>४)" क्ष" किरण सुविधा.<br>५) कुटूंब कल्याण शस्त्राक्रिया | वैद्यकीय अधिक्षक | १) आगमनानंतर त्याच दिवशी विविक्षित दिवशी<br>२) शिबीराच्या दिवशी | जिल्हा शल्य चिकित्सक |

| आरोग्य संस्था प्रकार | देण्यात येणाऱ्या सुविधा | सेवा पुरविणारे जबाबदार अधिकारी / कर्मचारी | सेवा पुरविण्यासाठी समय मर्यादा | सेवा विहित कालावधीत पुरविली न गेल्यास ज्यांच्याकडे तक्रार करता येईल ते अधिकारी |
|---|---|---|---|---|
| | ६) राष्ट्रीय आरोग्य कार्यक्रमांतर्गत रुग्णांना आरोग्य सेवा<br>७) विशेष सेवा उदा. बालरुग्ण, स्त्रीरोग तज्ञ इ.<br>८) आरोग्यविषयक जागृती आरोग्य शिबीरे. | | | |
| कुटीर रुग्णालये/ उपजिल्हा रुग्णालये | १) आंतररुग्ण व बाहयरुग्ण सेवा.<br>२) छोटया शस्त्रक्रिया<br>३) रक्त, लघवी, थुंकी व प्रयोगशाळेतील सर्व चाचण्या/तपासण्या.<br>४) ष किरण सुविधा.<br>५) कुटूंब कल्याण शस्त्राक्रिया<br>६)राष्ट्रीय आरोग्य कार्यक्रमांतर्गत रुग्णांना आरोग्य सेवा<br>७) विशेष सेवा उदा. बालरुग्ण, स्त्रीरोग तज्ञ इ.<br>८) आरोग्यविषयक जागृती आरोग्य शिबीरे. | वैद्यकीय अधिक्षक | १)) आगमना नंतर त्याच दिवशी.<br>२) विविक्षित दिवशी.<br>३) शिबीरांच्या दिवशी. | जिल्हा शल्य चिकित्सक |
| जिल्हा रुग्णालये | १) छोटी व मोठी शस्त्रक्रिया<br>२) रक्तपेढी,<br>३) कुटूंब कल्याण शिबिरे,<br>४) नेत्रशिबीरे इतर.<br>५) रोगनिदान शिबीरे,<br>६) राष्ट्रीय कार्यक्रम एडस् नियंत्रण,<br>७) मनोविकृती चिकित्सा केंद्रे, १० खाटांचा कक्ष,पुनर्वसन केंद्र,<br>८) विविध प्रकारच्या तपासण्या,<br>९) क्ष-किरण यंत्र सेवा,<br>१०) तात्काळ सेवा अहोरात्र,<br>११) दंतचिकित्सा,<br>१२) सोनोग्राफी<br>१३) (सीटी-स्कॅन )काही ठिकाणी) | वैद्यकीय अधिक्षक | १) आगमनानंतर त्याच दिवशी<br>२)विविक्षित दिवशी<br>३) शिबीरांच्या दिवशी<br>४) तपासणीनंतर त्याच दिवशी | जिल्हा शल्य चिकित्सक |
| स्त्री रुग्णालये | १) बाहयरुग्ण विभाग (स्त्रियांसाठी) गरोदर माता प्रसुती सेवा.<br>२) रक्तपेढी<br>३) कुटुंब कल्याण कार्यक्रमांतर्गत तांबी,स्त्री | वैद्यकीय अधिक्षक /अधिक्षका/ वैद्यकीय | १) आगमना नंतर त्याच दिवशी<br>२) विविक्षित | जिल्हा शल्य चिकित्सक |

| आरोग्य संस्था प्रकार | देण्यात येणाऱ्या सुविधा | सेवा पुरविणारे जबाबदार अधिकारी / कर्मचारी | सेवा पुरविण्यासाठी समय मर्यादा | सेवा विहित कालावधीत पुरविली न गेल्यास ज्यांच्याकडे तक्रार करता येईल ते अधिकारी |
|---|---|---|---|---|
| | नसबंदी शस्त्रक्रिया<br>४) वैदयकीय गर्भपात सुविधा<br>५) जोखमीच्या मातांना प्रसुती सेवा, सिझेरियन इत्यादी सेवा<br>६) गंभीर प्रसुतीविषयक रुग्णांसाठी अतिदक्षता विभाग<br>७) नवजात बालकांच्या विशेष काळजी कक्ष (SNCU).<br>८) इक्लामशिया रुग्णांवर उपचार.<br>९) नवजात बालकांवर मुलभुत उपचार<br>१०) बालरुग्ण व नवजात शिशु सेवा,प्रशिक्षीत वैदयकीय अधिकारी<br>११) स्त्री रोग विषयक सेवा (Gynecological services)<br>१२) जोखमीच्या बालकांचे क्लिनीक (High risk clinic)<br>१३) प्रसुती तज्ञांच्या सुविधा<br>१४) सोनोग्राफी सुविधा<br>१५)वंधत्वा वरील उपचार सुविधा | अधिकारी | दिवशी<br>३) शिबीरांच्या दिवशी | |
| विभागीय संदर्भ सेवा रुग्णालये | १) आंतरुग्ण व बाहयरुग्ण सेवा<br>२) हदयरोग तपासणी, मुत्रपिंड उपचार<br>३) रक्त तपासण्या/थुंकी व प्रयोगशाळेतील सर्व चाचण्या,लघवी<br>४) अद्यावत प्रयोगशाळा सुविधा-रुग्णालयीन प्रयोगशाळमध्ये ॲटो ॲनालझर, सेल काउंटर इत्यादी.<br>५) कर्करोग तपासणी-तोडाचा रक्ताचा, गर्भाशयाचा कर्करोग इत्यादी.<br>६) सोनोग्राफी,सिटी स्कॅन, क्ष किरण,२ डी इका, ॲन्जीओग्राफी इत्यादी<br>७) रक्तपेढी-आंतररुग्ण विभागात शस्त्रक्रिया रुग्णांना रक्त पुरविण्यासाठी अद्यावत रक्तपेढी<br>८) विशेष सुविधा-<br>अ) मुत्रपिंड उपचार व शस्त्रक्रिया - | वैदयकीय अधिक्षक | १) आगमनानंतर त्याच दिवशी<br>२) विविक्षित दिवशी<br>३) शिबीरांच्या दिवशी | जिल्हा शल्य चिकित्सक |

| आरोग्य संस्था प्रकार | देण्यात येणाऱ्या सुविधा | सेवा पुरविणारे जबाबदार अधिकारी / कर्मचारी | सेवा पुरविण्यासाठी समय मर्यादा | सेवा विहित कालावधीत पुरविली न गेल्यास ज्यांच्याकडे तक्रार करता येईल ते अधिकारी |
|---|---|---|---|---|
| | लिथोट्रीप्सी,लेझर किरणोपचार,डायलेसिस,मुत्रपिंडरोपण शस्त्रक्रिया इत्यादी.<br>आ) भौतिकोपचार शस्त्रक्रिया (Pediatric Surgery)-रुग्णांकरिता भौतिकोपचाराची व्यवस्था उपलब्ध आहे.<br>इ) अर्भक शस्त्रक्रिया<br>ई) सुगठण शस्त्रक्रिया (Plastic Surgry) दुघर्टनामुळे निर्माण होणा-या विद्रुपतेवर व जन्मत: निर्माण होणारी विकलांगता व विद्रुपतेवर उपचार<br>उ) हदय विकार उपचार व शस्त्रक्रिया - ॲन्जीओग्राफी,ॲन्जीओप्लस्टी,बायपास सर्जरी<br>ऊ) कर्करोग आणि कर्करोग औषधोपचार- कर्करोग किरणोपचारासाठी लिनियर ॲक्सलरेटर ची सुविधा, ब्रॅकी थेरपी (Brachy thereph) कर्करोग औषधोपचार (Chemotheraph),कर्करोग शस्त्रक्रिया (Onco Surgery) | | | |
| अपंगत्वाचे प्रमाणपत्र | हे प्रमाणपत्र मुंबई व मुंबई उपनगर वगळता अन्य ठिकाणी जिल्हा शल्य चिकित्सक देतील. मुंबई व मुंबई उपनगर येथे अधीक्षक, जे.जे.रुग्णालय हे अपंगत्व प्रमाणपत्र देतील. प्रमाणपत्र मिळविण्यासाठी कोऱ्या कागदावर विहित नमुन्यात अर्ज करावा लागेल. अर्ज केल्यानंतर १० दिवसांत प्रमाणपत्र दिले जाईल वा कारणासह १० दिवसांत प्रमाणपत्र दिले जाईल वा कारणासह नाकारले जाईल. | मुंबई व मुंबई उपनगराकरिता अधीक्षक, जे.जे. रुग्णालय, मुंबई वगळता अन्य ठिकाणी जिल्हा शल्य चिकित्सक. | अर्ज प्राप्त झाल्यावर १०दिवसांत | मुंबई वगळता अन्य ठिकाणी मंडळाचे उपसंचालक, आरोग्य सेवा, मुंबई करिता संचालक,आरोग्य सेवा |
| मनो-रुग्णालय | मानसिकदृष्टया आजारी असलेल्या रुग्णांवर उपचार बाहयरुग्ण सेवा, आंतररुग्ण सेवा, वैद्यकीय उपचार, सायकॅट्रीक / नॉन सायकॅट्रीक औषधे प्रयोगशाळा तपासण्या, आहार, व्यवसाय उपचार, वस्त्रप्रावरणे जसे गादी, उशी, चादर, ब्लँकेट, गणवेश | वैद्यकीय अधिक्षक, मनोविकृती तज्ञ,वैद्यकीय अधिकारी | आगमनानंतर त्याच दिवशी. | उप संचालक, आरोग्य सेवा |

| आरोग्य संस्था प्रकार | देण्यात येणाऱ्या सुविधा | सेवा पुरविणारे जबाबदार अधिकारी / कर्मचारी | सेवा पुरविण्यासाठी समय मर्यादा | सेवा विहित कालावधीत पुरविली न गेल्यास ज्यांच्याकडे तक्रार करता येईल ते अधिकारी |
|---|---|---|---|---|
| | इत्यादी | | | |

आरोग्य शिक्षण कार्यक्रम

| आरोग्य संस्था प्रकार | देण्यात येणाऱ्या सुविधा | सेवा पुरविणारे जबाबदार अधिकारी /कर्मचारी | सेवा पुरविण्यासाठी समय मर्यादा | सेवा विहित कालावधीत पुरविली न गेल्यास ज्यांच्याकडे तक्रार करता येईल ते अधिकारी |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| आरोग्य शिक्षण उपक्रम | १) सर्व राष्ट्रीय आरोग्य कार्यक्रमां-संबंधीचे आरोग्य शिक्षण साहित्य तयार करणे व त्याचे वितरण करणे.<br>२) महत्वाच्या आरोग्य कार्यक्रमाविषयी जनजागृती करण्यासाठी मोहिमांची आखणी व अंमलबजावणी करणे.<br>३) विविध राज्यस्तरीय आरोग्य कार्यक्रम व आरोग्य दिन साजरे करण्याबाबत मार्गदर्शन व सहाय्य. | जिल्हा आरोग्य अधिकारी<br><br>जिल्हाशल्य चिकित्सक<br><br>सर्वक्षेत्रीय अधिकारी आणि कर्मचारी | विहित वेळापत्रका नुसारव जनजागरण सोयीनुसार कार्यक्रमांचे आयोजन | उपसंचालक, आरोग्य सेवा, राज्य आरोग्य शिक्षण व संपर्क विभाग, परिवर्तन, इमारत, विश्रांतवाडी पोलीस स्टेशनसमोर, विश्रांतवाडी येरवडा, पुणे ४११ ००६. Email : idiecb@vsnl.com दुरध्वनी - २६६१०१८० (वै) २६६१०१७८ (का) २६६१०१७९ (फॅक्स) |

## कुटुंब कल्याण कार्यक्रम

| आरोग्य संस्था प्रकार | देण्यात येणाऱ्या सुविधा | सेवा पुरविणारे जबाबदार अधिकारी /कर्मचारी | सेवा पुरविण्यासाठी समय मर्यादा | सेवा विहित कालावधीत पुरविली न गेल्यास ज्यांच्याकडे तक्रार करता येईल ते अधिकारी |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| जोडप्यांसाठी सेवा | आवश्यक तेव्हा गरोदरपणा, सुरक्षित गर्भपात इ. बाबत जनजागरण आणि त्याअनुषंगाने आरोग्य सेवा / उपचार | जिल्हा आरोग्य अधिकारी /जिल्हा शल्य चिकित्सक | वेळापत्रका-नूसार भेटीनंतर | अतिरिक्त संचालक (कु.क.) पुणे. |
| जननसंस्थेचे आजार | जननसंस्थेचे आजार /लैगिंक संबंधातून पसरणारे आजार यांचे प्रतिबंध, उपचार, आरोग्य शिक्षण व जनजागृती. | जिल्हा आरोग्य अधिकारी /जिल्हा शल्य चिकित्सक | वेळापत्रका-नूसार भेटीनंतर | अतिरिक्त संचालक ( कु क ) पुणे. |
| लसीकरण | राष्ट्रीय लसीकरण कार्यक्रमांतर्गत गर्भवती महिला तसेच बालकांसाठी लसीकरण कार्यक्रम. | वैद्यकीय अधिकारी, प्राथमिक आरोग्य केंद्र / ग्रामीण रुग्णालय / उपजिल्हा रुग्णालय | एक दिवस | अतिरिक्त संचालक ( कु क ) पुणे. |

## नियमित लसीकरण कार्यक्रम

| आरोग्य संस्था प्रकार | देण्यात येणाऱ्या सुविधा | सेवा पुरविणारे जबाबदार अधिकारी /कर्मचारी | सेवा पुरविण्यासाठी समय मर्यादा | सेवा विहित कालावधीत पुरविली न गेल्यास ज्यांच्याकडे तक्रार करता येईल ते अधिकारी |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| नियमित लसीकरण कार्यक्रम | बालकांना होणारा घटसर्प, डांग्या खोकला, पोलिओ हिपॅटायटिस बी, क्षयरोग गोवर आणि गरोदर मातांना होणारा धनुर्वात या संसर्गजन्य रोगांविरुध्द प्रतिकार शक्ती निर्माणकरण्यासाठी ही योजना केंद्रपुरस्कृत आहे योजनेअंतर्गत केंद्रशासनाच्या राष्ट्रीय लसीकरण वेळापत्रका-नुसार पात्र लाभार्थींना लस देण्यात येते | जिल्हा आरोग्य अधिकारी /आरोग्य अधिकारी मनपा व क्षेत्रिय अधिकारी आरोग्य कर्मचारी | वेळापत्रका-नूसार विहीत कालावधीत | अतिरिक्त संचालक ( कु क ) पुणे |
| पल्स पोलिओ लसीकरण/ विशेष लसीकरण | पल्स पोलिओ लसीकरण मोहिमे-मध्ये पाच वर्षाखालील सर्व बालकांना पोलिओचे लसीकरण करणे. | जिल्हा आरो ग्य अधिकारी/आरोग्य अधिकारी मनपा व क्षेत्रिय अधिकारी आरोग्य कर्मचारी | मोहिम कालावधीत बुथवर व त्यानंतर शहरीभागात पाच दिवस व ग्रामीण | अतिरिक्त संचालक राज्य कुटुंब कल्याण कार्यालय |

| आरोग्य संस्था प्रकार | देण्यात येणाऱ्या सुविधा | सेवा पुरविणारे जबाबदार अधिकारी /कर्मचारी | सेवा पुरविण्यासाठी समय मर्यादा | सेवा विहित कालावधीत पुरविली न गेल्यास ज्यांच्याकडे तक्रार करता येईल ते अधिकारी |
|---|---|---|---|---|
| पल्स पोलिओ लसीकरण मोहिम | | | भागात ३ दिवस घरोघरी जाऊन बुथ वर लस घेतली नाही अशा बालकांना पोलिओ लस देणे | |

## बाल आरोग्य कार्यक्रमांतर्गत देण्यात येणा-या सुविधा

| आरोग्य संस्था प्रकार | देण्यात येणाऱ्या सुविधा | सेवा पुरविणारे जबाबदार अधिकारी /कर्मचारी | सेवा पुरविण्यासाठी समय मर्यादा | सेवा विहित कालावधीत पुरविली न गेल्यास ज्यांच्याकडे तक्रार करता येईल ते अधिकारी |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १) राष्ट्रीय बाल स्वास्थ्य कार्यक्रम- जिल्हास्तर | अंगणवाडीस्तरावर ० ते ६ वर्षे वयोगटातील मुलांची आरोग्य तपासणी व शासकीय व निमशासकीय शाळेतील ६ ते १८ वर्ष् वयोगटातील मुलांची आरोग्य तपासणी | राष्ट्रीय बाल स्वास्थ्य कार्यक्रमांतर्गत स्थापन केलेल्या पथकातील वैद्यकीय अधिकारी (पु व स्त्री) औषध निर्माता, आरोग्य परिचारिका यांचेमार्फत आरोग्य तपासणी | जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय | अतिरिक्त संचालक (कुक.) पुणे. |
| २) अ) ग्राम बाल विकास केंद्रे - | वैद्यकीय समस्या नसलेल्या सॅम व मॅम बालाकांना ३० दिवसांसाठी अंगणवाडीस्तरावरील ग्राम बाल विकास केंद्रामध्ये दाखल करुन पूरक आहार देऊन वैद्यकीय अधिका-यांमार्फत तपासणी व उपचार केले जातात. | उपकेंद्र स्तरावरील आरोग्य सेविका व प्रा.आ.केंद्रस्तरावरील वैद्यकीय अधिकारी, अंगणवाडी सेविका | जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद | अतिरिक्त संचालक (कु.क ) पुणे.) . |
| ब) बाल उपचार केंद्रें- निवडक प्रा.आ.केंद्र, ग्रामीण् रुग्णालय व उपजिल्हा /जिल्हा रुग्णालय स्तरावर | सौम्य वैद्यकीय समस्या असलेल्या सॅम बालकांना २१ दिवसांसाठी बाल उपचार केंद्रामध्ये दाखल करुन वैद्यकीय अधिकारी यांचेमार्फत तपासणी करुन उपचार व उपचारात्मक आहार देण्यात येतो. तसेच मातेस बुडीत मजुरी देण्यात येते. | जिल्हा/उपजिल्हा रुग्णालय, ग्रामीण रुग्णालय व निवडक प्रा.आ.केंद्र स्तरावरील बालरोग तज्ञ वैद्यकीय अधिकारी, | जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय | अतिरिक्त संचालक (कु.क) पुणे. |

| आरोग्य संस्था प्रकार | देण्यात येणाऱ्या सुविधा | सेवा पुरविणारे जबाबदार अधिकारी /कर्मचारी | सेवा पुरविण्यासाठी समय मर्यादा | सेवा विहित कालावधीत पुरविली न गेल्यास ज्यांच्याकडे तक्रार करता येईल ते अधिकारी |
|---|---|---|---|---|
| | | परिचारिका | | |
| क) पोषण पुनर्वसन केंद्र-जिल्हा/ उपजिल्हा/स्त्री रुग्णालय स्तरावर | १५ आदिवासी जिल्हयातील गंभीर वैद्यकीय समस्या असलेल्या बालकांना पोषण पुनर्वसन केंद्रामध्ये दाखल करुन वैद्यकीय अधिकारी यांचेमार्फत तपासणी, उपचार व उपचारात्मक आहार दिला जातो. मातेस बुडीत मजुरी व दोन वेळचा आहार तसेच आहाराबाबतचे प्रशिक्षण देण्यात येते. | बालरोगतज्ञ , वैद्यकीय अधिकारी, आहारतज्ञ व परिचारिका | जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय, वैद्यकिय अधिक्षक, उपजिल्हा/स्त्री रुग्णालय स्तरावर | अतिरिक्त संचालक (कु.क) पुणे. |
| ३) जीवनसत्व अ व जंतनाशक मोहिम जिल्हास्तर | वर्षातून दोन वेळा राज्यामध्ये जीवनसत्व अ व जंतनाशक मोहिम राबविण्यात येऊन १ ते ६ वर्ष वयोगटातील बालकांना जीवनसत्व अ व जंतनाशक औषधीची मात्रा दिली जाते. | वैद्यकीय अधिकारी, आरोग्य परिचारिका अंगणवाडी सेविका | जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा शल्य चिकित्सक, वैद्यकीय आरोग्य अधिकारी | अतिरिक्त संचालक (कु.क) पुणे. |
| ४)नवजात बालकांची काळजी (३४एसएनसीयूज) | गंभीर आजारी, कमी वजन असलेल्या नवजात बालकांना, विशेष नवजात काळजी कक्षामध्ये दाखल करुन बालरोग तज्ञांमार्फत तपासणी,उपचार करण्यात येतात. | बालरोग तज्ञ, आरोग्य परिचारिका | जिल्हा सामान्य रुग्णालय | अतिरिक्त संचालक (कु.क) पुणे. |

## योजना

| योजनांचे नाव | देण्यात येणाऱ्या सुविधा | सेवा पुरविणारे जबाबदार अधिकारी /कर्मचारी | सेवा विहित कालावधीत पुरविली न गेल्यास ज्यांच्याकडे तक्रार करता येईल ते अधिकारी |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| जननी सुरक्षा योजना | या योजनेअंतर्गत अनुसुचित जाती, अनुसुचित जमाती व दारिद्रिय रेषेखालील सर्व लाभार्थी गर्भवती मातांना लाभ दिला जातो. या योजनेचा लाभ लाभार्थी महिलेचे वय १९ वर्ष व लाभार्थी महिलेस दोन जिवंत अपत्यापर्यंत देय होतात. केंद्र शासनाकडील दिनांक ०८.०५.२०१३ च्या पत्रान्वये लाभार्थीचे वय व अपत्या संबंधीच्या अटी शिथील करण्यात आलेल्या आहेत. | जिल्हा आरोग्य अधिकारी जिल्हा शल्य चिकित्सक , वैद्यकिय आरोग्य अधिकारी, मनपा, वैद्यकिय अधिकारी व आरोग्य कर्मचारी | अतिरिक्त संचालक आरोग्य सेवा, पुणे |

